# KÁMKANDALÁ NÁTAK

OR

## KILLING OF THE KING KÁMSÉN.

BY

ÉKNÁTH GANÉSH BHÁNDÁRÉ,

MORSE SIGNALLER, G. I. P. STATION JABALPUR.

SECOND EDITION.

PUBLISHED BY

BHAU GOVIND SAPKAR,

IN THE "DNYAN CHAKSHU" PRESS

POONA.

*Registered under Act XXV of* 1867.

1886.

*Price Rupee* One

# कामकंदला नाटक.

अथवा

## कामसेन राजाचा वध.

हें पुस्तक

केवळ लोकरंजनार्थ,

**एकनाथ गणेश भांडारे,**

मॉर्स सिग्नलर, जी॰ आय॰ पी॰ स्टेशन जबलपूर,

यांणीं रचून पुनः तपासलें व सुधारून वाढविलें.

ते

पुणें, पेंठ बुधवार येथें,

**भाऊ गोविंद सापकर**

यांणीं आपल्या

"ज्ञानचक्षु" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

दुसरी आवृत्ति.



सन १८८६ इसवी.

किम्मत २ रुपया.

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.

(सारांशरूपानें.)

पुस्तकांत वेश्येच्या नादीं लागल्यामुळें प्राप्त झालेल्या भयंकर परि-
थोडेंसें दिग्दर्शन करून परपुरुष अथवा परस्त्रीवर पापवासना
परिणाम, स्त्रीसाहस, स्त्रीचातुर्य वगैरे गोष्टी दाखविल्या आहेत.

स्तक वाचून वाचकांचें कांहींसें मनरंजन झालें असें म्यां ऐकलें
 श्रम बरेच सुफलित झाले असें मी समजेन.

जबलपूर. }
१।४।८१. } एकनाथ गणेश भांडारे.

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

पहिल्या आवृत्तींत असलेले सर्व अमंगल प्रकार काढून पुष्कळ ठिकाणीं, योग्य वाटले तसे, चांगले चांगले फेरबदल करून भाषणें व कविता शुद्ध घालून ' लोकांचें ' होईल तितकें ' रंजन ' करण्याचा यत्न करून ही आवृत्ति तयार केली आहे. हींत वर लिहिलेले बहुतेक उद्देश कांहीं अंशीं सिद्धीस गेले आहेत; हें मार्मिक वाचकांच्या तेव्हांच लक्ष्यांत येईल. तरी हींत दोषस्थलें पुष्कळच असतील. परंतु ज्ञात्यांनीं त्यांकडे आपली दृष्टि सौम्य करून बघावें व हंसक्षीरन्यायाचें अनुकरण करून त्यांतूनच त्यांनीं गुणकणांचें शोधन करावें अशी त्यांस प्रार्थना आहे.

ज्या ज्या माझ्या खऱ्या हितचिंतकांनीं आपला अमोल वेळ खर्चीं घालून परोपकारबुद्धीनें ह्या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीवर यथार्थ टीका करून माझें फार हित केलें त्या त्या विविधज्ञानविस्तारकारादि महाजनांचा मी अत्यंत ऋणी आहें. व रा. रा. भाऊ गोविंद सापकर, ज्ञानचक्षूचे मालक, पुणें, ह्यांनीं ही आवृत्ति लोकांपुढें आणली ह्मणून मी त्यांचाही आभारी आहें.

ह्या पुस्तकाच्या निमित्तानें कांहीं 'लुंग्यासुंग्या' पत्रांतून कुत्सितबुद्धीनें बाष्कळ लेख लिहून ज्यांनीं आपली अनुदारता प्रगट केली; त्यांचा मुळीं उल्लेखच करण्यास माझें मन घेत नाहीं !

हें पुस्तक छापत असतां नजरचुकीनें राहिलेल्या हस्तदोषांची क्षमा असावी.

जबलपूर.
ता० १६।३।८६ } एकनाथ गणेश भांडारे.

# कामकंदला नाटक

अथवा

# कामसेन राजाचा वध.

## कथेची संगति.

( प्रवेश—सूत्रधार व विदूषक ).

**विदूषक**—( लवून ) नमस्कार हो ! सूत्रधार बुवा ! नमस्कार!

**सूत्रधार**—नमस्कार ! कां ? आली कां आपली स्वारी येथें ?

**विदूषक**—हो! हो! आली तर ! सगळ्या भारतवर्षांत तुमच्या 'सर्व-रसिकरंजनैकपरायणा ' चा डंका गाजवून आली !

**सूत्रधार**—ठीक ! मी आपले उपकार कधीं विसरणार नाहीं ! पण आज आपण इकडे कोणीकडे ?

**विदूषक**—आज चार वर्षांत तुमची आमची भेट नाहीं ; ह्मणून आज सहज तिचा लाभ घेण्यास आलों !

**सूत्रधार**—( आत्मगत ) कामसेनाच्या नृत्यशाळेंत आज त्या कामकंदलेचें गाणें आहे. तें ऐकण्यास चाललों तों उगीच कटकट रिकामी मध्यें आली!

**विदूषक**—कांहो ! आज हें चक्रीदार पागोटें, हा पांढरा अंगरखा, हा पायांत चर्मी जोडा, हा तोंडांत तंबाखूचा बार, हें मिशांला तूप, हा डोळ्यांत सुरमा, ही कानांत झोंकदार भीकबाळी, व हें कपाळावर अक्कडबाज केशरी गंध लावून आपला असा हा तोरा कोणीकडे चालला ?

**सूत्रधार**—कामसेनाकडचें आज गायनानिमित्त पाचारण आहे ह्मणून मी हा तिकडेसच निघालों.

**विदूषक**—वाहवा ! मग तुमची आमची तर मैत्रीच जुडली !

**सूत्रधार**—कशी ती ?

**विदूषक**—पहा, कशी ती ! तुह्मांला आहे कामसेनाचें पाचारण ! आह्मांला आहे विक्रमाचें निमंत्रण ! तुह्मांला सभेंत मिळणार अत्तराचा वास ! आह्मांला रानांत मिळणार खायाला हरणाचें मास ! कां आहे ना ही पूर्णोपमा मैत्री ?

**सूत्रधार**—होय बाबा ! नाहीं कोणीं ह्मणावें ? एकूण तुह्मी विक्रमाबरोबर शिकारीला जाणार ह्मणायचें !

**विदूषक**—जाणार ह्मणजे ? हा पहा निघालोंच ह्या पायीं !

**सूत्रधार**—ठीक आहे ! यावंत आपण !

**( विदूषक जातो. )**

**सूत्रधार**—गेली पीडा एकदांची ! त्रास चुकला ह्मणायचा ! ( चहूंकडे निरखून पाहून ) अरे, पण हा द्विजपुत्र रस्ता चुकलासा दिसतो ! ह्याशीं आपण ओळख करून गाणें ऐकण्याची त्यास अभिरुचि असल्यास कामसेनाच्याच नृत्यशाळेंत घेऊन जाऊं ! चला तर ! तो पहा माझ्याकडेच पहात आहे !

( जातो. )

( पडदा पडतो. )

---

# अंक पहिला.

## प्रवेश १ ला.

### स्थल—अरंण्य.

### पात्रें.

**माधव**....................................ब्राम्हणपुत्र.

( तदनंतर **माधव गंधर्वारंण्याचे**ठाई प्रवेश करून ह्मणतो. )

**माधव.**—( मनांत ) आज मला घर सोडून बरोबर एक वर्ष होत आलें. गरीबीमुळें पित्यानें मला "देशाटन करून द्रव्य मिळवून आण" ह्मणून सांगितलें; परंतु माझें प्रारब्धच कसें हात धुऊन मागें लागलें आहे ! आज एक वर्ष झालें, थोडे राजे धुंडले ? परंतु उपयोग काय ? आपल्या प्रारब्धींच नसलें तर ते तरी कोठून देतील ? असों, नशीब माझें ! पहा, ज्या गुणेंकरून मनुष्य चांगला दिसतो तोच गुण कांहीं काळांतरेंकरून अयोग्यतेस पात्र होतो. आजपर्यंत ज्या ज्या राजे रजवाड्यांच्या येथें मी राहिलों त्या त्या लोकांनीं, माझें मदनाहीपेक्षां उत्तम प्रकारचें स्वरूप पाहून, मला वाटे लाविलें ! बरोबरच आहे. ते माझें हें सुंदर स्वरूप पाहूनच मला राहूं देण्यास साशंक झाले असतील. एकून द्रव्यहानि, मानहानि, उदासीनता आणि चिंता इतक्यांस ही सुंदरताच कारण झाली काय ? जर ह्या तोंडानें मी घरीं गेलों तर पिता मला काय म्हणेल? "इतक्या दिवस मी मेहनत घेऊन जें यास शिकविलें तें सर्व व्यर्थ जाण्याकरितां कीं काय ? जसा गेला तसा हात हालवीत आला!" असें बोलणें ज्यापेक्षां निमुटपणें ऐकावें, त्यापेक्षां आतां घरींच जाऊं नये, हें सर्वस्वीं उत्तम. मग होणें असेल तें होईल.

( उभा राहून उघड रीतीनें ह्मणतो. ) अहाहा ! काय ह्या अरण्याचें वर्णन करावें, कीं, ज्यामध्यें कोट्यवाधि वृक्ष गगनचुंबित गेले आहेत. यामुळें असें वाटतें कीं, ह्या निराधार आकाशानें भूतलाप्रत पतन न

व्हावें एतदर्थच आपल्या पराक्रमेंकरून त्यास ते सांवरून धरितात. किती तरी देखावा उत्तम हा ! ! खरोखर कोणी एकादा दु:खी प्राणी येथें प्राप्त झाला तरी त्यास घटकाभर आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं. फार तर काय, ह्या वसंतऋतूच्या योगानें वृक्षांस नूतन पल्लव फुटल्या-मुळें चहूंकडे सुगंध सुटला आहे, आणि त्यामुळें प्रत्यक्ष गंधर्वही आपला मार्ग चुकून येथें येत असल्यास नवल नाहीं ! ( उभा राहून ) वाहवा ! अशी अद्वितीय शोभा म्यां कधींच पाहिली नसल्यामुळें माझा तर्क अगदीं गर्क झाला आहे. पण येवढेंही असून अशा सुस्थलीं कोणी मनु-ष्य नाहीं, तेव्हां हें लहान का आश्चर्य ! ! पण मी रस्ता तर चुकलों नाहींना? होय! असेंच खरें! कारण, ही समोरची अवंती नाहीं असें वाटतें. अवंतीची रचना कांहीं विलक्षणच! मग हें नगर कोणतें असेल तें असो! अस्तु. ( पाहून ) हा एक सद्गृहस्थ दिसत आहे; त्यालाच जाऊन विचारूं ह्मणजे झालें !

( जातो. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा.

### देवनगरी—राजसभा.

**पात्रें.**

**कामसेन**................देवनगरीचा राजा.
**चंद्रचूड**..................त्याचा प्रधान.
**वीरबाहु**..................सेनापति.
**जयसिंग**..................राजसेवक.

( सर्व सभा घनदाट बसली आहे तों कामसेन राजा येऊन सिंहासन सुशोभित करतो आणि प्रधानास ह्मणतो. )

**कामसेन**—प्रधानजी, राज्याचा बंदोबस्त कसा काय ठेविला आहांत? आजकाल प्रजा तर सुखांत असते ना ?

**चंद्रचूड**—( हात जोडून ) सरकार, आपण राज्यप्रकरणीं बिलकूल काळजी करूं नये. माझ्यासारखा आपल्या पदरीं प्रधान असतांना, राज्यप्रकरणीं तिळभर तरी न्यूनता पडेल कीं काय ? कधीं नाहीं. सरकार, ज्याप्रमाणें एकादी अबला आपल्या पोटच्या लेंकराचें प्रेमपूर्वक पालन पोषण करते तद्वत् मी आपल्या कृपावलोकनेंकरून प्रजापालन करीत आहें. पर्जन्याचा सुकाळ असल्यामुळें सर्व प्रकारचीं धान्येंही विपुल आहेत. दुसरें, महाराजांच्या दराऱ्यामुळें, दुष्ट, हिंसकादिकांनीं देशांतरास पलायन केलें. आज्ञेनुसार गुन्हेगारांस योग्य शिक्षा देववितों. तसेंच कापट्यवेषधारी साधुलोकांस आणि स्त्रीलंपटांस तर राज्यप्रवेशण्यास सुद्धां हुकूम नाहीं. सारांश, जगत्सर्गसंहारकारकाच्या कृपेनें व आपल्या पराक्रमानें सर्व राष्ट्रांतलि लोक आनंदसागरांत वास करीत आहेत.

**कामसेन**—( संतोषानें ) शाबास, प्रधानजी शाबास. प्रधान असावे तर आपल्यासारखेच. प्रधानजी, मी मनःपूर्वक सांगतों कीं, आपण ह्या ( हृदयावर हस्त ठेवून ) **कामसेनाच्या** राज्यांत आहांत ह्मणूनच हें राज्य उत्तम प्रकारें चालत असून त्याची कीर्ति दिग्मंडळापर्यंत पसरली आहे. वास्तविक मी सांगतों कीं, आपली तोंडावर स्तुति करावी असें नाहीं, परंतु आपल्यासारखा सूज्ञ, नीतिज्ञ, सर्वज्ञ, बुद्धिमान् व शूर प्रधान अद्याप एकही पाहण्यांत तर काय, परंतु ऐकण्यांतही नाहीं आला. राजा काय तो सिंहासनाचा मात्र अधिकारी; परंतु सर्व राज्यकारभार प्रधानावरच अवलंबून असतो. सारांश, षड्गुणैश्वर जो करुणाकर दीनवत्सल त्यापाशीं माझें करद्वय जोडून इतकेंच मागणें आहे कीं, यांना तूं कृपावलोकनेंकरून शतायुषी कर आणि माझ्या राज्याचेंही वैभव उत्कर्षतेस पावीव ह्मणजे झालें.

**चंद्रचूड**—सरकार, आतां या दासाची कितपत स्तुति करणार? वास्तविक इतकी माझी योग्यताच नव्हे. कारणः—

**श्लोक.**

**राज्ञि धर्मिणि धर्मिष्ठाः पापे पापाः समे समाः ॥**
**प्रजास्तदनुवर्तंते, यथा राजा तथा प्रजाः ॥ १ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणें राजाची वर्तणूक असते तद्वत् विशेषेंकरून प्रजे-

चीही असते. आणखीं, जर राजा धर्मात्मा असला तर प्रजाहि धर्मात्मी होईल. आणि राजाच जर मध्यम, तर प्रजाही तद्वत्च समजली पाहिजे. तर, हे राजोत्तमा, वर सांगितलेल्या सर्व कारणांस राजाच मूळ होय. आपल्यापुढें ह्या दासाची आतां कितपत योग्यता आहे हें या श्लोकावरून महाराजांच्या लक्ष्यांत पूर्णपणें येईलच.

**कामसेन**—सत्य होय प्रधानजी. कारण, ज्या वेळेस मी लहानपणीं गुरुजींजवळ राजनीति शिकत असें त्या वेळेस वारंवार गुरुजींनीं मला याप्रमाणें बोधपर श्लोक सांगून त्यांचा अर्थ अक्षरशः मनांत ठसवीत जावा. पहा, जो राजा सदाचरणी असतो, त्याची प्रजा तशीच. आणि दुराचारी असतो, त्याचीही विशेषेंकरून तशीच. वरच्या वाक्यास प्रमाण प्रधानजींनीं ह्मटलें तें होय व दुसऱ्या वाक्यास हें प्रमाण:—

**श्लोक.**

**सिंहरूपेण राजानो, व्याघ्ररूपेण मंत्रिणः ॥**
**भृत्याश्च गृध्ररूपेण, क्षयं यास्यंति वै प्रजाः ॥ २ ॥**

**अर्थ**—राजाच जर सिंहरूपी असला तर त्याचे प्रधान व्याघ्र होत. भृत्यादिक गीध, प्रजा निर्बल असते. आणि जर नृपति सदाचारी असला तर सर्व आपआपल्या मर्यादेनें असतात. आणि तोच जर तसा नसला तर प्रत्यक्ष त्याचे आप्तच त्याचा नाश करण्यास भीत नाहींत. उदाहरणार्थ पहा, प्राचीन काळीं पृथ्वीवर प्रबळ असा राजा कुरुवंशीं **दुर्योधन** होता. त्याचे बांधव पांडव हे होत. **दुर्योधन** हा फार कुव्यसनी व दुराचारी असल्याकारणानें त्याचे प्रधान **दुःशासन कर्णादिक** त्याच वळणावर गेले. आणि पांडवांत **धर्मराज** हा फार सद्गुणी असल्या कारणानें त्याचेही प्रधान **भीमादिक** त्याच पंथें जाते झाले. होतां होतां अंतीं प्रत्यक्ष त्याचे बांधव पांडव यांच्याच हस्तें **दुर्योधन** सर्वांसह नाशास पात्र झाला. सारांश, राजा जर चांगला असला तर त्याची प्रजाहि चांगली असते. ह्यावरून प्रधान राजापेक्षां कमी योग्यतेस पात्र आहे हें सिद्ध झालें. प्रधानजी, बरोबर आहे. आपण ह्मटलें तेंच सत्य होय. असो, ( सेनापतीकडे पाहून ) सेनापते, सैन्याचीं संख्या व बंदोबस्त कसा काय आहे? वगैरे कथन करावें.

**वीरबाहु**—( हस्तजोडून ) भूपते, ईश्वरकृपेनें आजकाल आपल्या-जवळ प्रमुख असे २०० सरदार आहेत. प्रत्येक सरदार असा पराक्रमी आहे कीं, समोर जरी महाकाळ येऊन युद्ध करण्यास सिद्ध होईल तरी तो रण करण्यास मागें पुढें पाहणार नाहीं. अशा प्रत्येक सरदाराजवळ शंभर अतिरथी, दोनशें महारथी, चारशें रथी, सोळा हजार घोडेस्वार आणि पायदळाची तर संख्या वर्णन करण्यास मी असमर्थ आहें. परशत्रु ह्मणजे सिंहापुढें जंबुक, किंवा सूर्यासमोर खद्योत, तद्वत् होय ईश्वरेच्छेकरून तोही देखावा कधींनाकधीं तरी दृष्टोत्पत्तीस येईलच.

**कामसेन**—शाबास सेनापते शाबास! सांप्रतकालीं राज्यव्यवस्था तर उत्तम ठेविली खरी, परंतु ( चंद्रचूडाकडे पाहून ) प्रधानजी, यंदां **विक्रमास** राज्यकारभार दिला आहां किंवा कसें?

**चंद्रचूड**—हे नृपचूडामणे, ह्या वर्षी **विक्रमास** राज्यकरभार नाहीं देऊं शकलों, कारण, सुमारें चार महिने झाले **वीरबाहूनें** सांगितलें कीं, आजकाल फौजेची संख्या फारच वाढत चालली आहे, ह्याकरि-तां ह्या सालीं जितका पैसा तिजोरींत होता तितका सर्व याचपायीं खलास झाला. पुढच्या सालीं, सरकार पाहतां येईल.

**कामसेन**—अरेरे, प्रधानजी, हें तर तुह्मीं चांगलें कृत्य केलें नाहीं. कारण, ह्या भूमंडळावर सार्वभौम तोच असून त्याच्या मर्जीविरुद्ध हें कर्म केलेंत, तर कदाचित् त्यास राग येऊन तो युद्धास उभा राहील; याचा मात्र तुम्हीं पूर्णपणें विचार करा.

**सर्व**—महाराज, तसाच जर प्रसंग आला तर पाहतां येईल. सर-कारास काळजी करणें नलगे.

**कामसेन.**—अस्तु, प्रधानजी, घटकाभर मनोनरंजनार्थ आपल्या नृत्यशाळेंत जाऊं चला! व तेथें त्या प्रतिरंभेस आपल्या लव्याजम्यासह येण्यास सांगा.

**चंद्रचूड.**—( हात जोडून ) आज्ञा सरकार. ( इकडे तिकडे पाहून ) कोण आहेरे येथें? **जयसिंग**?

**जयसिंग.**—( हात जोडून ) हुकूम सरकार.

**चंद्रचूड.**—जा त्या कामकंदलेस गाण्याकरितां घेऊन ये.

**जयसिंग.**—बहोत अच्छा महाराज.

**चंद्रचूड.**—जा तर लौकर जा.

**जयसिंग**—( जातो. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ३ रा.

### देवनगरी—नृत्यशाळा.

**पात्रें.**

**कामसेन**..................देवनगरीचा राजा.
**चंद्रचूड**..................प्रधान.
**कामकंदला**..............एक वेश्या ( नायिका. )
**माधव**....................द्विजपुत्र ( नायक ).

सेनापति, सेवक, वाजविणारी मंडळी व प्रेक्षक इ०.

( कामसेन, चंद्रचूड वगैरे येतात. )

**कामसेन.**—प्रधानजी; मानासिकश्रमपरिहारार्थ गायन ऐकणें हें बरेंच साधन आहेसें मला वाटतें.

**चंद्रचूड.**—आपण ह्मणतां ही गोष्ट खरी, तथापि जरा विचार करून पाहिलें तर मानसिकश्रमपरिहारार्थ तदितर पुष्कळ साधनें आहेत.

( कामकंदला लवाजम्यासह नृत्यशाळेच्या दारांत येऊन उभी राहते. )

**कामसेन.**—( तिला पाहून, सहर्ष. )

**कटाव.**

**वेश्येची कांती कैची; ही विद्युत्प्रतिमा साची ॥ ध्रु० ॥**
**जिकडे तिकडे प्रभा फांकली; सुंदर अधरोष्ठाची लाली;**
**विलसे त्यामधिं दंतपंक्तिते; कुंदकळ्यापरि साच भासते;**

लुम छुम लुम छुम वाजति नूपुर, कामि जनांच्या चित्ता वर वर; देतिल आल्हादा न कसे हे; भुलतिल योगी बघुनि रूप हें; शोभे अंगीं तंग कंचुकी; दंग करिल सुंदरी साचकीं!; पीनस्तन पाहुनी अहा ! हे; चक्रवाकची गमती मला हे; चंद्रहार गळस-ऱ्यादीकते; अलंकारें माच भासते; मुखाब्जीं हो ! विडा रंगला; सभेंत येतां चंद्र भासला; मृगही भ्याला कमललोचना; गजही लाजे पाहुनि गमना; भृकुटी भासे धनू रेखिलें; विशाळभाळीं कुंकुं चर्चिलें; विधात्यानें स्वप्रज्ञेची; कमाल करुनी ह्या सुंदरिची पुतळी निर्मियली ही साची ॥ १ ॥ वेश्ये० ॥

**कामकंदला.**—( येऊन ) राजाधिराज ! (नम्रतेनें प्रणाम करते.)

**कामसेन.**—आतां त्वां गाण्यास आरंभ करावास !

**कामकंदला.**—फार उत्तम आहे. ( गाऊं लागते. )

**राग यमनकल्याण.**

दीम दीम तना, रे, दीम दीम तना, तना, नादरदरतनत्रों, त्रों तनना, तनदरन, दीम दीम तना, तनदरन, दीम दीम तना, तनदरना, तनदरना, तनदरना, ( २ ) नित नितना, तनात्रों, त्रोंतनन, तनदरन, तनदरन, तदार तारे दानी, नादर दर तना, त्रों, त्रों तनन, तनदरन, दीम दीम तना ॥ अंत्रा ॥ नारे नारे दिर दिर ताधीम, तर रितार, तर रितार, नित नित ना, तन-त्रों त्रोंतननें, तनदरन, तनदरन तारे तदार दानि नादरदर तना, त्रों, त्रोंतननें, तनदरन, दीम दीम तना ॥ १ ॥

( पडद्यांत. )

मकरंदपानार्थ कमलिनीसभोंवतीं रुंजी घालणाऱ्या मधुपांची मार्मिकता इतक्यांतच लयास गेली काय ?

**कामकंदला.**—( ऐकून, स्वगत. ) असं खरं ! पण पहा बाई इतका मर्मज्ञ कोण असावा ?

**जयसिंग.**—( कामसेनास हात जोडून. ) सरकार ! कभी यह गाना तो निहायत उमदा हुवा. लेकीन दरवाजेके बाहर एक बम्हनका

लडका, जिसकी उमर बीस, बाईसकी होगी. कहता है की इस नृत्य-शालामें गानेंका मर्मज्ञ एक भी नहीं है क्या ? मैनें इसका कारन उसे बहोतदफे पूछा; लेकिन वह बताता नहीं. सो मैने आपसे विदित कर-दिया है.

**कामसेन.**—( आश्चर्य ) प्रधानजी; एकूण त्या द्विजपुत्राच्या मतें आ-पण मूर्ख ठरलों ! असो. जयसिंग !

**जयसिंग.**—जी सरकार !

**कामसेन.**—त्या द्विजपुत्रास आंत घेऊन ये !

( जयसिंग त्यास घेऊन येतो. )

**प्रवेश—माधव.**

**माधव**—( कामकंदलेकडे पाहून मनांत. ) ओ हो: काय अद्भुत रूप हें ? हीच कां ती कमलिनी? पण कमलिनीचें असें सदोदित हास्य-मुख नसतें. ह्या सुवर्णलतिकेच्या योगानें ही नृत्यशाळा फारच रमणीय दिसते ! अस्तु, हिचा अभिलाष आपणांस काय उपयोगी ?

**कामकंदला**—( माधवास मोहून ) अहाहा ! क्रीडा करावी तर ह्याच पुरुषाबरोबर करावी! किती तरी सुंदर, भव्य व नाजुक चेहरा हा!

**कामसेन**—हे चतुर पुरुषा ! यावें. आपण येथें विराजमान होऊन माझें वंदन ग्रहण करावें !

**माधव**—( वर हात करून. )

**श्लोक.**

लक्ष्मी तुझ्या मंदिरिं राबुनीयां ॥
कीर्ती तुझ्या अंकित होउनीयां ॥
वाणी तुझ्या आननिं मूर्तिमंत ॥
राहो; करो ती तुज भाग्यवंत ! ॥

**कामसेन**—( हात जोडून ) हा दासावर अनुग्रहच झाला ! तथापि दु:खप्रद नसेल तर किंचित् आत्मवृतकथनानें आपण आमचें समाधान करावें.

**माधव**—कामसेना ! माझें नांव माधव. राहणें गंधर्वपुरींत. घरचे आम्हीं सुदामजी ह्मणून द्रव्यसंपादनार्थ मी देशाटन करीत आहें. चालतां चालतां तुझ्या नगरींचा शोध काढून येथें दाराबाहेर येऊन उभा राहिलों ; तों ( कामकंदलेकडे बोट दाखवून ) ह्या स्त्रीचें गायन ऐकूं आलें ! गायन ही चीज कोणास तल्लीन करणार नाहीं ? मी तर हिच्या गायनानें तल्लीन होऊन बाहेर चित्रासारखा तटस्थ उभा राहिलों !

**कामकंदला**—( स्वगत ) ही माझी खरी स्तुति असेल काय ?

**कामसेन**—द्विजराज ! परंतु आपण मकरंदास्वादलोलुप जे मधुकर, त्या त्यांची मार्मिकता लयास गेल्याबद्दल जो उद्गार काढला त्याचा अर्थ काय ?

**माधव**—राजा ! स्पष्ट बोलणारा वक्ता व तें निमुटपणें ऐकून घेणारा श्रोता जगांत बहुधा दुर्मिळ ! तथापि, तुझी इच्छा आहे तर ऐक ! ( कामकंदलेकडे बोट दाखवून ) हिनें **यमनकल्याण** राग फार उत्तम प्रकारें गाइला, व ही गातेही उत्तम; परंतु तिचा पखवाज वाजविणारा चांगला असून चांगला नाहीं असें ह्मणण्यास चिंता नाहीं. कारण, त्या वाजविणाऱ्या मनुष्यास अंगठा नाहीं, कसचा दुसऱ्या पदार्थाचा काविला आहे असें दिसतें. ह्या कारणानें पखवाजावर थाप मारकी असतां चांगली उठत नाहीं. परंतु हें एकाच्याही लक्ष्यांत आलें नाहीं !

**कामकंदला**—( त्याचें शहाणपण पाहून चकित होत्ये व त्याच्या स्वरूपास मोहून मनांत ) अग बाई, किती तरी शहाणपण हें ! ! इतके हे मेले मोठमोठ्या मिशांचे ताव घालून बसले आहेत, पण एकाच्यासुद्धां लक्ष्यांत आलं नाहीं. तेव्हां अर्थात् यांना फार चांगलं गातां येत असावं असं वाटतं. अहाहा ! स्वरूप तरी किती उत्तम आहे ! मदनाला सुद्धां या मनमोहनावरून ओंवाळून सोडावा ! काय त्या भोंवया ! काय तें पहाणं ! बोलणं तरी कसं स्पष्ट आणि कोमल ! शरिराचा बांधा तरी पहा किती उत्तम आहे ! खरोखर यांना रंभासुद्धां मोहित झाल्या असल्यास नवल नाहीं ! मी तर मग मानवजातीची असून अबलाच आहें. हे जर माझ्या घरीं येतील तर माझ्यासारखी दैववान् मीच म्हटली पाहिजे! असं वाटतं कीं, एकदम ह्या जीवलगाच्या गळ्यांत मिठी मारावी. असो, प्रयत्न करून पाहीन नंतर प्रारब्ध.

**कामसेन**—**जयसिंग**, त्या पखवाज वाजविणाऱ्यास इकडे बोलाव पाहूं. ( **जयसिंग** त्यास राजाजवळ घेऊन येतो; नंतर **कामसेन** म्हणतो ) तुझें नांव काय आहे ?

**बिलासखां**—**बिलासखां**.

**कामसेन**—काय, तुला अंगठा नाहीं ? व लावला आहे तो कोणत्या पदार्थाचा आहे ?

**बिलासखां**—( हात जोडून ) सरकार, बराबर आज चार बरस भये, मेरी अंगुठी तरवारसे तूटी है तबसे मैंनें आपना पेट भरनेके लिये मोमकी अंगुठी लगाई है. और वैसेही हाथसे मैं तबला बजाताहूं.

**कामसेन**—( **माधवा**कडे पाहून ) शाबास, **माधवा** शाबास. धन्य आपलें चातुर्य ! ( प्रधानाकडे पाहून, ) **प्रधानजी**, यांना आपण एक लक्ष होन आणि वस्त्रालंकार बक्षीस देऊन आपल्या पदरीं ठेवावें. आणि या **बिलासखां**स दोनशें होन बक्षीस देऊन वंशपरंपरेनें चालू असा एक गांव द्यावा. आणि आपल्या **श्यामराजपंतास** पखवाज वाजविण्याकरतां बोलावूं पाठवा.

**चंद्रचूड**—( तसें करून ) **जयसिंग**, लौकर जा आणि **श्यामराजपंतास** घेऊन ये.

( **जयसिंग** त्यास घेऊन येतो. )

**श्यामराजपंत**—(हात वर करून) राजाधीराजाचा जयजयकार असो.

**कामसेन**—पंत महाराज, माझ्या वचनास मान देऊन एक घटकाभर **कामकंदले**मागें पखवाज वाजवावा, अनमान करूं नये.

**श्यामराजपंत**—फार उत्तम आहे; आपली आज्ञा मला शिरसावंद्य आहे. (पखवाज वाजवण्यास बसतो. )

**कामसेन**—**कामकंदले**, जितकी तुझ्यांत गाण्याची निपुणता असेल तितकी दाखवून **माधवाला** तूं आज खुष करावेंस.

**कामकंदला**—फार उत्तम आहे. ( गाऊं लागत्ये. )

तराणा ( भूपकल्याण. )

नादरदरदर तुंदर दर दर दानि दोम ॥ ताना दिर दि-
रताना दीम. तननननननन, नादर दानि तुंदर दानि त-
दार तारे दीम, तॅना दिर दिर तॅना दीम तॅना दिर
दिर दिर तॅना दीम ॥ नादर० ॥ १ ॥ अंत्रा ॥ दरन
दरन दरन दीम, तदीम दीम, धित्तुम् धित्तील्लाना दिर
दिर, ताना दिर दिर ताना दीम, तिरिक्टितक, धि-
रिक्टितक, धिरिकिट धित्लाम धिरिक्टितकधा,
तक्टि धिधिकिट धिलांगधा, तक्टि धिधिकिट धिलां-
गधा, तक्टि धिधिकिट धिलांगधा, ॥ नादर० ॥ २ ॥

माधव—( मनांत ) अहाहा ! ! ही रंभा तर नाहींना ! किती तरी
हा कंठ मधुर ! काय तें स्वरूप ! काय तो आवाज ! काय तें नाचणें !
शाबास कामकंदले शाबास ! मज अभाग्यास असली स्त्री कसली
प्राप्त होणार ? वय सुद्धां हिचें फार दिसत नाहीं. फार झालें तर १५
किंवा सोळा वर्षांचें असेल. आणि ह्या यौवनाच्या योगानें रूपास
उपमा सुद्धां सांपडणें नाहीं. हिनें उंच स्वराची तान घेतली त्या
वेळेस असें वाटलें कीं, हिच्या सर्व सुकुमार अंगांतलें यौवन हिच्या
गाण्यास मदत करण्याकरितां वर जात आहे कीं काय ? अहाहा !
अशी सुंदरी कोठेंच नसेल ! परंतु आपल्यास काय उपयोग ? मनांत चु-
रमुरे खाणें व्यर्थ आहे. असो ईश्वराची मर्जी. ( उघड ) शाबास वेश्ये
शाबास ! फार उत्तम गायन केलेंस. आजपर्यंत मी पुष्कळ देश हिंडलों,
परंतु तुझ्यासारखें गायन कधीं ऐकिलें नाहीं. हें घे तुला बक्षीस. ( असें
ह्मणून तिला वस्त्रभूषणें देतो ).

कामकंदला—( तीं माधवाच्या अंगावर परत टाकून विनयानें )

दिंडी.

मला तुमचीं पटभूषणें नकोत ॥
तुम्हालागीं लखलाभ हीं असोत ॥
भृंग, कमलिनि सौंदर्य बघुनि कांहीं ॥
तिच्यावरती कधिं लुब्ध होत नाहीं ! ॥ १ ॥

**माधव**—( स्वगत. ) शाबास ! खूप टोला दिलास ! ( उघड. ) तथापि हे सुंदरी !

दिंडी

**तया जैशी मकरंद पान गोडी ॥**
**असे तैशी मजलाहि फार थोडी ॥**
**परी नाहीं अनुकूळ विधी मातें ॥**
**मान देई मम वस्त्रभूषणातें ॥ १ ॥**

**कामकंदला**—( स्वगत ). मना ! धडधड उडूं नकोस ! प्रियाच्या प्रेमाची खूण आहे त्याअर्थी कर तूं त्यांचा आतां स्वीकार ! ( उघड ) आपली इच्छा ! ( वस्त्रभूषणांचा स्वीकार करते ).

**कामसेन**-( **माधवाकडे** पाहून क्रोधानें ) हे विप्रा, आपण निमुटपणें चालले जा. नाहीं तर ह्या भरसभेमध्यें फजीतीस मात्र पात्र व्हाल. आहांत आपण विद्वान् खरे, परंतु आपली ह्या सभेंत बसण्याची योग्यता नव्हे. व ह्याचें कारण मी सांगूं शकत नाहीं. ( प्रधानाकडे पाहून ) प्रधानजी, मघां मी तुमच्याच मुखानें ऐकलें कीं, दुराचारी, कापट्यवेषधारी साधु लोकांस व स्त्रीलंपटांस राज्य सुद्धां प्रवेशण्यास हुकूम नाहीं, तर मग हा स्त्रीलंपट कसा येथें येऊं शकला? घालवा ह्यास सभेबाहेर. ह्या वेळेस तळची आग मस्तकांत गेली आहे !

**माधव** (जातो.)

**कामसेन**—हे कामकंदले, जर मी तुझ्याबद्दल कांहीं वाईट ऐकिलें तर मग मात्र दूरवर विचार पहा ह्मणजे झालें. जा तुह्मी घरीं ह्या वेळेस सर्व.

**कामकंदला**—( डोळ्यांत आंसवें आणून ) शिव ! शिव ! हे नारायणा ! बरं तुझी मर्जी !

( कामकंदला वाजविणाऱ्यांसह जाते ).

**कामसेन**—भालदार, राज्ञीमंदिराचा मार्ग दाखीव !

( सर्व जातात ).

( पडदा पडतो ).

## प्रवेश ४ था.

### कामकंदलेचा महाल.

**पात्रें.**

**कामकंदला**....................वेश्या.
**गिरजा**.......................कामकंदलेची दासी.

( तदनंतर कामकंदला दासीसह प्रवेश करिते ).

**गिरजा**—( हात जोडून ) बाईसाहेब, आतां दहा घटका रात्र झाली कीं ! निजण्यास चलावं.

**कामकंदला**—( आंसवें आणून ) प्रभो ! आतां मी काय करूं? जेव्हां सभेबाहेर त्या दुष्टानं काढलं तेव्हां ते मनांत किती दुःखी झाले असतील ? ह्या वेळेस स्वारी कुठं असेल ? गांवांत राहण्यास तर मेल्यानं अडथळा घातला आहे ! रानांत रात्र फार झाल्यामुळं ह्या वसंतऋतूची गुलाबी थंडी त्या मनमोहनास वाजत असेल नाहीं कां ? सख्या, नकाहो ह्या दीन दासीचा आतां त्याग करून जाऊं ! पाण्यावांचून जसा मासा तरफड तरफड करतो तसंच ह्या वेळीं मला होत आहे! आपल्याला त्या भयंकर रानांत थंडी वाजत असेल खरी, परंतु आपल्या वियोगानं ह्या वेळेस मला जी काय उष्णता होते ती माझी मीच जाणं ! अरे देवा, तुला कांहींच का ह्या दीन अबलेची दया येत नाहीं ? नको आतां अंत पाहूं, जर ह्या कामकंदलारूपी चातकास माधवरूपी स्वात्यंबूची भेट करविशील तरच हा चातक वांचेल, नाहीं तर पुढचं भविष्य तूं जाणतच आहेस. ( श्वास टाकून रडूं लागते ) शिव शिव ! हे माधवा ! माधवा ! ( मूर्च्छित होते ).

**गिरजा**—(घाबरून) अग बाई, हें काय झालं ! (डोळ्यांस पाणी लावते व ह्मणते) बाईसाहेब, अहो बाईसाहेब; अहो डोळे उघडा हो. ही पहा मी **गिरजा** जवळ आहें. उठा उठा, असं काय करतां?

**कामकंदला**—(किंचित् सावध होऊन) **गिरजे**, तूं कांहीं घाबरूं नको. मी शुद्धीवर आहें. व मला कांहीं एक झालं नाहीं. परंतु आतां माझी अशी रोजच अवस्था होणार. शिव शिव ! **माधवा** !

**गिरजा**—(गहिंवरून) बाईसाहेब, असंहो काय मेलं? अहो, डोळे तर उघडा. **माधव** तो कोण, व इतके शरीराला कष्ट ते कशाकरतां? मला तर बाई यांतलं कांहीं समजत नाहीं. वास्तविक मला जर हें वर्तमान अक्षरशः सांगाल तर मी कांहीं तरी उपाय करीन किंवा दुसरी एकादी युक्ति आपणास सांगून ती वस्तु आपल्या हस्तगत करून देईन. बरं आधीं उठून तर बसा.

**कामकंदला**—(उठून बसते) दासी, काय सांगूं? मवां **कामसेना**-चं गाण्याकरतां बोलावणं आलं होतं ह्मणून मी सर्व वाजविणाऱ्यांसह नृत्यशाळेंत गेलें हें तर तुला माहितच आहे. तेथें गेल्याबरोबर मीं गाण्यास आरंभ केला. एक राग पुरा झाला किंवा नाहीं तों एक सुंदर द्विजपुत्र येऊन बोलला कीं, " वेश्या तर काय, परंतु गायन ऐक-णारे सुद्धां मूर्ख समजले पाहिजेत. " या प्रमाणं त्यानं दोनदां म्हटलं. नंतर त्या मेल्या **जयसिंग्यानं** तें वर्तमान राजास सांगितलं. राजानं त्यांचा आदर सत्कार उत्तम रीतीनं करून त्यांना वस्त्र भूषणंही दिलीं. कांहीं वेळानंतर राजानं तसं ह्मणण्याचं कारण पुसलं. **गिरजे**, काय त्या तरुण पुरुषाच्या चातुर्याचं वर्णन करूं!! जसा तो पुरुष गुणानं तसा स्वरूपानंही उत्तम आहे. ज्या वेळेस त्यांनीं राजाशीं सं-भाषणं केलीं त्या वेळेस त्यांचे ते दंत प्रतिकुंदच आहेत असं वाटे. आतां त्यांच्यावांचून मला हा महाल अगदीं स्मशानवत् भासत आहे! दासी, ह्या छपरीपलंगावर जी पुष्पशय्या घातली आहेस ती मला खैराच्या निखाऱ्यांप्रमाणं भासत आहे. आणि त्या मुळं मला जी उष्णता होते ती माझी मीच जाणं! तसेच, हे जे उत्तम प्रकारचे सुगंधित हार केलेस ते मला जिवलगाच्या वियोगानं सर्पाप्रमाणं भासतात. **गिरजे**, मी तुला फार शहाणी ह्मणून ह्मणत होतें, परंतु वास्तविक तुझ्यासारखी मूर्ख मीं कुठंहीं पाहिली नाहीं. कशी ह्मणशील तर, अग, ह्या वेळेस प्राणनाथ कोणत्या दुःखाकष्टांत असतील आणि म्यां चांडाळणीनं हे तूं केलेले गोविंदविडे पुढं ठेविले आहेत ते खावेत ना! वः! काय गोष्ट तुझी! (विडे फेकून देते) अग, हे सुवर्णाचे रत्नजडित अलंकार मीं आपल्या अंगावर घातल्यामुळं, मला बाई, त्यांचं ओझं झालं आहे! काढ काढ लौकर काढ! (डागिने काढले). तसंच ह्या समयास **माधवराव**

कोणत्या दु:खांत असतील आणि म्यां चांडाळणीनं पांचपेडी वेणी घालून बसावं काय ! ( श्वासोश्वास टाकून ) शिव शिव नारायणा ! सर्वस्वी त्यांना त्या आडरानांत अशा भयंकर रात्रींच्या समयास रक्षण करणारा तूंच आहेस. ( जरा थांबून ) **गिरजे**, चल आपण त्यांच्या शोधास जाऊं. येतेसना ? ऊठ तर लौकर ऊठ. ( उभी राहून जाऊं लागत्ये तों दासी तिच्या पातळाचा पदर धरून बसविते ).

**गिरजा**—अहो, अंमळ थांबाल तर खरं. मीहि येत्येंच, परंतु पुढं काय झालं व इतका आपणास विरहानं त्रास कां दिला, काय त्या पुरुषाचं चातुर्य पाहून आपण त्यावर भ्रमरीप्रमाणं मोहित झालां, वगैरे सर्व मला कृपा करून सांगा ह्मणजे मी, आपली व त्यांची भेट करवीन. व जर मी हें असत्य भाषण करीत असेन तर माझ्या गळ्याचीच शपथ, आपण कां इतके गांगरतां ? या, बसा. ( बसते )

**कामकंदला**—अहाहा ! **गिरजे**, राजानं त्यांना तसा प्रश्न करतांच त्यांनीं, आपल्या **बिलासखां** तबलच्यास मूळचा आंगठा नाहीं हें तर तुला माहितच आहे. तर बाई सांगायचं कारण काय कीं, चतुरपणानं तें समजून कामसेनास सांगितलं ! **कामसेना**सही मोठं आश्चर्य वाटून त्यानं चौकशीअंतीं पाहिलं तों तें खरंच ! नंतर राजानं दुसरा तबलची आणवून मला पुन: उत्तम रीतीनं गाण्यास सांगितलं. मी मग **भूपकल्याण** राग गाइला. माझं गाणं ऐकल्यावर ते फार प्रसन्न होऊन, त्यांनीं मला सर्व वस्त्र भूषणें ( तीस दाखविते ) दिलीं. हें राजानं पाहतांच त्यांचा अपमान करून त्यांनां सभेबाहेर घालवून दिलं. मला बाई त्या वेळेस इतकं वाईट वाटलं कीं, सांगतां पुरवत नाहीं. राजानं माझ्याकडे पाहून मला सुद्धां जबरदस्त भीति घातली आहे. ( डोळ्यांत आंसवें आणून ) हर हर, म्यां चांडाळणीनं तरी तीं वस्त्रभूषणें कशाला घ्यावींत ? चहूंकडून मीच अभागीण, त्यांच्या क्लेशास, दु:खास व अपमानास कारण झालें! दासी, मनुष्याला सर्व दु:ख सहन होऊं शकतं परंतु अपमानाचं दु:ख सहन करणं ह्मणजे औदुंबरपुष्पच समज. शिव शिव, ह्या चांडाळणीची अक्कल कशी त्या वेळेस गुंग झाली होती कोण जाणं ? ! ( दासीच्या गळ्यांत हात घालते व तिच्या गुडघ्यावर आपलें मस्तक ठेवून गहिंवरते ). दासी, सर्वस्वी माझे आईबाप

तूंच आहेस, सर्व भरंवसा तुझाच आहे. तूंच माझी त्यांची आतां भेट कर. प्रिये, जर तूं माझं हें दुर्घट कार्य साधून दिलंस तर मी जन्मों-जन्मीं ऋणी होईन. (श्वास टाकून) हर हर माधवा ! माधवा ! कशी आपणा उभयतांची भेट होईल ती होवो ! तुझ्याकरितां हे पंचप्राण अगदीं तंगीं लागले आहेत ! ( रडूं लागते. )

**गिरजा**—( तिचे डोळे पुसून ) बाईसाहेब, उगी व्हा, असं काय करतां ? अंमळ धीर धरा. मी त्यांची व आपली भेट करवीन. यानंतर प्रारब्ध ! पण प्रयत्न करून पाहीन.

**कामकंदला**—खरंच काय त्यांची भेट करविशील ? अहाहा! असंच जर होईल तर माझ्यासारखी नशीबवान् मीच ह्मटली पाहिजे. गिरजे, उठ तर लौकर, जा आणि त्या मनमोहनास घेऊन ये.

**गिरजा**—ही पहा मी चाललें, पण कदाचित् जर त्यांची माझी गांठ पडली तर मीं कांहीं त्यांनां पाहिलें तर नाहींच, मग मी त्यांनां माधव ह्मणून कसं ओळखूं ? व ते तरी मला कशी ओळख देतील. याकरितां बाईसाहेब आपण मला एक विनंतिपत्र देऊन त्यांच्या स्वरूपाच्या कांहीं खुणा सांगितल्या असतां बरं पडेल.

**कामकंदला**—( कांहीं वेळ मनन करून—एक विनंतिपत्र लिहिते व तें दासीजवळ देऊन) गिरजा, हें घे पत्र. आणखीं त्यांच्या स्वरूपाच्या खुणा ह्या आहेतः—एकतर स्वरूपानं मदनापेक्षां शतपट चांगले आहेत. सदोदित हास्यमुख, परंतु सांप्रत अपमानानं व माझ्यामुळं कसं असेल तें असो, नाक नीट असून भाळ विशाळ आहे. आजानुबाहु आहेत, कर्दळीच्या गाभ्याप्रमाणं पोट्र्या असून सर्व शरीर कोमळ व बांधेसूद आहे. पाहशील तेव्हां समजेलच. जा प्रिये लौकर जा आणि त्यांनां लौकर घेऊन ये.

**दासी**—फार उत्तम आहे, जातें तर आतां. ( जाते. )

**कामकंदला**—हो. ( असें म्हणून पलंगावर स्वस्थचित्तें माधवाच्या विवंचनेंत पडते. )

( पडदा पडतो. )

## प्रवेश ४ था.

स्थळ-दे[illegible]रील- संतविलासबाग.

पात्रें.

माधव..................द्विजपुत्र.
गिरजा..................कामकंदलेची दासी.

( माधव सखेद होऊन प्रवेश करतो. )

माधव—आतां मात्र माझ्या प्रारब्धाची सीमा झाली ! हर हर परमेश्वरा, तुझी तर मजवर बिल्कुल कृपादृष्टि दिसत नाहीं ! कृपा असती तर वास्तविक मी या स्थितीस येऊन माझा व त्या रंभेचा वियोगच झाला नसता ! ! अहाहा ! काय तिच्या स्वरूपाचें वर्णन करूं ? मला वाटतें कीं, तिच्या सुंदर स्वरूपास जेवढ्या उपमा सांपडतील तितक्या सरते शेवटीं अयोग्यतेसच पात्र होतील ! कारण, मुखास पौर्णिमेच्या चंद्राची उपमा देऊं तर त्यास क्षय असून कलंकही आहे. व हिचें गोजिरवाणें मुख निष्कलंक आहे ! नाकास जर चांफेकळीची उपमा दिली तर त्या कळीस बहुतकरून साधुसंत अंगिकारून प्रेमभावें विष्णूच्याठायीं अर्पण करून अंतीं नाकासच मुक्ति पावतात ! परंतु ह्या नाकास लुब्ध होऊन अज्ञान मौक्तिकांनीं सुद्धां सागराचा त्याग करून त्याचा अंगीकार केला ! ! तसेंच मदनमिश्रित गालांस जर गुलाबपुष्पाची उपमा द्यावी, तर त्या सुगंधित पुष्पाचा भोक्त्यानें उपभोग घेतला तर तें निस्तेज होतें, परंतु ह्या फुलांचा जसजसा भोक्ता उपभोग घेतो तसतसी त्यांस जास्त टवटवी येते ! त्याचप्रमाणें वेणीस जर कृष्णसर्पाची उपमा देऊं तर तो दुरून निरपराध्यास कधीं दंश करील काय ? नाहीं, परंतु ह्या वेणीरूपी कृष्णसर्पाचें माझ्यासारख्या कामीजनांस दर्शन झालें कीं, मदनरूपी सर्पदंश अंगीं भरून मनुष्य कामानें वेडा होतो ! एकूण स्त्रीसारखें रत्नच नाहीं ! जेव्हां तिनें मधां उंच स्वराची तान घेतली, त्या वेळेस त्या तांबूलयुक्त मुखकमलाची तरी किती शोभा दिसत होती ! वास्तविक तिच्यासारखी सुंदरी कोठेंच नसेल ! जेव्हां मी तबलच्यास आंगठा नाहीं ह्मणून सांगितलें तेव्हां ती मजकडे चकित

होऊन पाहूं लागली ! अहाहा ! त्या वेळेस तिचे ते भ्यालेल्या हरिणी-सारखे काळेभोर डोळे अजून माझ्या दृष्टीआड झाले नाहींत ! हे सुंदरी, मला तूं मनोभावेंकरून माळ घालशील काय ? मला तर तुझा आतां घटकाभर वियोग सहन होत नाहीं ! हे हंसगामिनी, ह्या वेळीं मला काळच प्रतिकूळ आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं ! व तुझा वियोग तर मला सहन होत नाहीं ! ह्मणून कोणास न कळतां ह्या **वसंत-विलास** बागेंतल्या भयंकर तळ्यांत प्राण द्यावा ह्मणजे परजन्मीं तरी आपण तिला वरूं ! ! ( असें ह्मणून विलाप करीत करीत तळ्याच्या कांठावर बसून आंत उडी टाकणार, इतक्यांत एका वृक्षाआडून ध्वनि निघतो ):—

अंजनीगीत.

**अंतरतां ती स्वप्रियकरणीं**<br>
**आणुनियां तळीला स्मरणीं !**<br>
**चक्रवाक हा रडत बसोनी**<br>
**तीतें आळवीत ! १**<br>
**तीहि तशी स्वप्रियकरयोगें**<br>
**अश्रू ढाळित बसली स्वभोगें !**<br>
**उभयतांच्या ते संयोगें**<br>
**सुखि नाचि परि होती ? २**

**माधव**—( चकित होऊन चहूंकडे पाहतो ) काय चमत्कार आहे ! मध्यरात्रीची वेळ होत आली ! चांदणें कसें स्वच्छ पडलें आहे ! चहूंकडे सामसूम झाली असून ह्या वेळेस सर्व प्राणी निद्रावस्थेंत असतां, ही कोणती स्त्री मजवर अमृत सिंचन करीत आहे बरें ? चक्रवाक कोण? चक्रवाकी कोणती ? तलावावर माझ्याखेरीज शोक करणारा तर दुसरा कोणीही दिसत नाहीं. तेव्हां अर्थात् ही अन्योक्ति मलाच अनुलक्षून असली पाहिजे यांत संशय नाहीं. अहाहा ! अन्योक्तिकलापात्गेरीणही चतुर दिसते. चिंता नाहीं, प्रश्न कोणासही कां अनुलक्षून असेना, उत्तर तर आपणच द्यावें; म्हणजे झालें. ( असें ह्मणत आहे तों पुनः दुसऱ्यानें तींच पदें ऐकूं येतात ).

माधव—

श्लोक.

तुझी वाणी वाटे किति तरि मला गोड रजनी !
परी दुर्दैवानें वसत शशि हा जोंवर जनीं !
तदाशा भेटीची विफळ दिसते तोंवर सये !
म्हणोनी तीं दोघें रडत बसलीं तच्छशिभयें !

( असें ह्मणून प्रथमतः ज्या वृक्षाआडून श्लोक ऐकूं आला त्या धोरणानें त्या वृक्षाजवळ जाऊन उभा राहतो; तों दासी एकदम येऊन नमन करून बोलते )

**गिरजा**—महाराज, मी आपणास लक्षून जीं अन्योक्तीनं गाणीं ह्मटलीं त्यांचं ठीक उत्तर तावडतोब मला मिळालं. ह्यावरून खात्रीपूर्वक वाटतं कीं, आपलं नांव **माधव** असावं.

**माधव**—वरं मग ?

**गिरजा**—कृपा करून आपण **कामकंदला** बाईसाहेबांच्या महालीं चलावं, त्यांनींच आपल्या शोधार्थ मला पाठविलं आहे. चलण्यास आपल्याकडून काडीमात्र हरकत नसावी; कारण, आज सायंकालपासून जशा ह्मणून राजाकडून गाऊन आल्या, तेव्हांपासून एकसारखा आपल्याकरतां शोक करीत आहेत. तर आतां आपण नाहीं ह्मणूं नये.

**माधव**—(तिचें मन पाहण्याकरतां) हे स्त्रिये, वेश्या मोठ्या कपटी, दुष्ट, दुराचारी, व कुव्यसनी असतात, ह्याकरतां त्यांच्या नादीं कोणीहि लागूं नये हेंच उत्तम. त्या द्रव्याच्या आशेनें वरून प्रीति दाखवितात आणि तोच आपल्या जवळचा पैसा नाहींसा झाला म्हणजे त्याचा केसानें गळा कापल्याखेरीज त्या कधींहि राहणार नाहींत, हें पक्कें लक्ष्यांत ठेव. ह्याकरतां " दुरून डोंगर साजरे दिसतात तेच बरे आहेत. " जवळ जाऊन कोण्या मूर्खानें फांसांत पडावें ?

**गिरजा**—आपण म्हणतां तें सारं खरं आहे; परंतु त्या तशा नाहींत. ज्यास आपला म्हणतील त्यासाठीं प्राण देतील ? मी शपथपूर्वक आपल्यास वचन देतें कीं, आपल्या केंसासमुद्धां धक्का पोंचणार नाहीं. ( असें म्हणून वचन देते ).

**माधव**—( हर्षानें ) परंतु तूं तिची कांहीं मला दाखविण्याकरतां खूण आणली आहेस कां ?

**गिरजा**—( त्याचें मन पाहते ) मी तर ३॥ हाताची खूण आहें ! मग दुसरीचं काय काम आहे ?

**माधव**—झालें तर मग; आल्या वाटेनें मुकाट्यानें जा, मी कांहीं येत नाहीं. ( असें म्हणून पुनः त्या तळ्यावर जाऊं लागतो, तों दासी त्याचा पदर धरून ह्मणते. )

**गिरजा**—हो बाई, त्यांनीं खूण दिली आहे.

**माधव**–कोठें ती आण पाहूं. ( असें ह्मणतांच **गिरजा कामकंदलेनें** दिलेलें विनंतिपत्र त्याच्या हातीं देते व तें चांदण्याच्या उजेडांत **माधव** मोठ्या हर्षानें वाचतो ):—

पत्र.

स्वस्ति श्री मम प्राणप्रिय माधवराय यांस, वि. वि.

॥ पद. ॥

( माझ्या बाळा रघुवीरा, वनासी जाऊं नको. या चालीवर )

**माधवराया तूं मजला, सोडुन जाऊं नको ॥ धृ० ॥**
**विनंतिपत्र, हें यावरी, लक्ष्य देउन वाचा तरी ॥**
**गृहीं यावें मम लौकरी, दासीसवें वेल्हाळा ॥ माध. ॥ १ ॥**
**आहे भेटीची मनिं आस, हर्षित करीं ममचित्तास ॥**
**नच आलां तर या जिवास, हानी होईल जाणपां ॥ मा. ॥२॥**
**वेश्या असून पतिव्रता, महानंदेसम मी नाथा ॥**
**पिता बंधु पर मज आतां, तुह्माविण सुंदरा ॥ मा. ॥ ३ ॥**
**शेवटिल विज्ञप्ती लिहित्यें, मी येत्यें तुज सांगातें ॥**
**न धरी संशय न्याया मातें, कामकंदलाभिरामा ॥ मा. ॥**
**माधवराया तूं मजला, सोडुन जाऊं नको ॥ धृ. ॥**

आर्या.

**त्वन्मंजुल गानातें परिसुनि मनिं धन्य आज म्यां व्हावें ॥**
**हेत असे मनिं माझ्या, सखया! येऊनि तयास पुरवावें ॥ १॥**

वरील मजकूर लक्ष्यांत आलाच असेल. आतां अंत न पाहतां महार्की येण्याची कृपा करावी. आमच्या सारख्यांनीं विशेष लिहिणें उचित नाहीं.

आपलें प्रेम इच्छिणारी,

कामकंदला.

**माधव**—( हर्षानें दासीस ह्मणतो ) हिच्या म्हणण्यास्तव मी तुझ्याबरोबर चलतों, परंतु मी सूर्योदयापूर्वी पुनरपि येथें येईन. असें जर कबूल असलें तर येतों. नाहीं तर——

**दासी**—त्याविषयीं आपण बिलकुल मनांत आणूं नये. तुमच्या केंसासुद्धां धक्का पोंचणार नाहीं व सूर्योदयापूर्वी आपल्यास इथें आणून पोंचवीन, मग तर झालें ना ?

**माधव**—फार उत्तम आहे, चला आतां.

( असें ह्मणून उभयतांही गमन करितात. )

पडदा पडतो.

---

## प्रवेश ५ वा.

### कामकंदलेचा रंगमहाल.

**पात्रें.**

**माधव**..................द्विजपुत्र.
**कामकंदला**..........वेश्या.
**गिरजा**..............तिची दासी.
**कामसेन**............राजा.
**चंद्रचूड**..............प्रधान.
**जयसिंग**.............सेवक.
इतर वाजविणारी मंडळी.

( तदनंतर **कामकंदला** जरतारी पांढरें शुभ्र पातळ नेसून व अंगांत निळी चोळी परिधान करून प्रवेश करिते. )

**कामकंदला**—( आपल्याशींच ) काय करावं ? दासीची व त्यांची भेट झाली असेल काय ? किंवा प्रियानं तर आपल्या जीवास अपमानान कांहीं करून घेतलं नसलंना ? प्राणनाथ एकीकडे व दासी त्यांच्या शोधार्थ भलतीकडे तर गेली नसेलना ? बरं, कदाचित् दासीची व त्यांची अकस्मात् दैवानं भेट झाली व तिनं प्रियाजवळ माझ्याबद्दल गोष्ट काढली असली तर ते तरी माझा अंगीकार करतील काय ? अथवा मी वेश्या ह्मणून तर माझा तिरस्कार केला नसेलना ? काय मेलं करावं ? सर्वच कल्पना कशा एकदम मनांत येतात. त्याच वेळीं जर, मी प्रियाचीं वस्त्रभूषणें घेतलीं नसतीं तर आज हा प्रसंग कां प्राप्त होता? देवा दासीची व त्यांची गांठ पाडून त्यांना माझा अंगीकार करण्याविषयीं बुद्धि दे ! ( श्वास टाकून ) दासीस जाऊन तर फार वेळ झाला, अजून, कां येत नाहीं कोण जाणं. ( डावा डोळा स्फुरण पावतो ), शकून तर बाई चांगले होतात; मग काय आहे कोण जाणं. ( इतक्यांत मोठ्यानें शब्द होतो ) अहो बाईसाहेब, दार उघडाहो लौकर.

( **प्रवेश**—गिरजा. )

**गिरजा**—( हर्षानें ) सरकार, आपल्या पादकमलाप्रत ही भ्रमररूपी दासी लीन होऊन वंदन करते.

**कामकंदला**—( तिच्या तोंडाकडे पाहून ) कल्याण होवो प्रिये; कां कसं काय ? मुखकमल तर प्रफुल्लित दिसतं. मग काय असेल कोण जाणं बाई, परंतु बहुतकरून काम तर सिद्ध झालंसं दिसतं.

**गिरजा**—( तोंड वाईट करून ) कस्चं काय आणि कस्चं काय, आहे तें बरंच आहे ! ( श्वासोश्वास टाकते. )

**कामकंदला**—( वाबरून ) काय काय ? गिरजे ! काय म्हटलंस ? भेट झाली नाहीं म्हणतेस ? ......

**गिरजा**—नाहीं हो, भेट तर आपल्या **वसंतविलास** बागेंतच झाली, परंतु त्यांनीं आपणा उभयतांचाही निषेध करून ग्रामांतरीं गमन केलं.

**कामकंदला**—( गहिंवरून डोळ्यांत आंसवें आणून म्हणते ) हा चांडाळणी ! हातचा हिरा गमावलास ग गमावलास ! ( तीस ढकलून )

जा; कर इथून काळं एकदाचं. मेली शहाणपणाचा तोरा तर मोठा मारीत असे; हा शहाणपणाचा कखलखीत उजेड पाडला काय? वा: काय तुझी गोष्ट? **माधवा**!! किती ह्या दासीचा आतां अंत पाहणार? असो, तुझी मर्जी. [ किंचित् मूर्च्छित होते तों माधव प्रवेश करतो आणि तिजजवळ जाऊन लवून म्हणतो. ]

**माधव**—हे **कामकंदले**, सावध हो, सावध हो; ज्याच्या प्राप्ती-करितां तूं हट्ट घेऊन ह्या स्थितीस पोंचलीस, तो प्रत्यक्षपणें तुझ्याशीं सस्नेह बोलत असतांनाही किमर्थ, मौन धारण केलेंस? चल उठ आणि एक वेळ माझ्याकडे प्रेमदृष्टीनें अवलोकन कर. ( ती झरकन उठते व दूर खालीं मान घालून उभी राहते ).

**माधव**—कां प्रिये, आतां किती लाजायचं? हं, मी समजलों, मा-झेवर रागावूं नकोस! ये, जवळ ये! दूर कां उभी?

**कामकंदला**—( खालीं पाहून ) माझ्या पत्रास मान देऊन मुखां-तून येवढे तरी गोड शब्द निघाले,हें माझं मोठं भाग्यच समजलं पाहिजे!

**माधव**—आतां तें कांहीं काढूं नकोस, मी अपराधी आहें खरा, क्षमा कर.

**कामकंदला**—अग बाई! हें काय तरी! ( असें ह्मणून माधवास पलंगावर बसविते. ) अपराध कशाचा? आणि आहे तरी काय?

**माधव**—कांहीं नाहीं, मधां मी तुझें मन पाहण्याकरितां तुला ह्या दासीद्वारें तसदी दिली. पण तूं भोळ्या मनाची खरी. दासीनें 'मी ग्रामांतरीं गेलों' व 'तुम्हा उभयतांचा निषेध केला' असें सांगतांच तूं तिची पूजा करून फारच शोभा करूं लागलीस व अंतीं 'शिव शिव **माधवा**, आतां किती या दासीचा आपण अंत पाहणार? बरं तुझी मर्जी!' असें म्हणून सूर्यास्तानंतर जसें कमल कोमेजून जातें तद्वत् तूं डोळे मिटून भूमीप्रत पतन पावलीस! ( गहिंवरून ) प्रिये त्या वेळेस मला जें वाईट वाटलें असेल तें मीच जाणें! असो.

**कामकंदला**—आपण केलंत तें ठीकच केलं. कारण, वेश्या ह्मणून जितक्या आहेत तितक्या सर्व पैशाच्या भुकेल्या असतात; व

तोच पैसा त्याजजवळचा नाहींसा झाला ह्मणजे मग मात्र तो कोण व ही कोण! तद्वत् मी आहे कीं काय याची आपण परीक्षा घेतलीत. बरं केलंत.

**गिरजा**—( **माधवा**कडे ) सरकार, माझी मेलीची अधींच्या मधींच पुष्पांजलि झाली. बरं तेंही असो, पण जसे म्हणून आपण आलांत, आपल्याला येऊन एक प्रहर झाला, बाईसाहेब एक चकारशब्दसुद्धां माझ्याशीं बोलल्या नाहींत. बरोबरच आहे "गरज सरो आणि वैद्य मरो" ही जी ह्मण आहे ती कांहीं खोटी नाहीं.

**कामकंदला**—आतां तूं किती टोले देणार? घटकाभर बोललं नाहीं ह्मणून गरज पूर्ण झाली काय? बरोबर आहे, तुम्ही थट्टा करून टोले न दिले तर मग आणखीं दुसरं कोण देणार? झाला खरा अपराध बाई, क्षमा कर.

**माधव**—हं हं, थट्टा करतां करतां तुम्ही उभयतां भांडण्यास लागला कीं, काय?

**गिरजा**—नाहीं हो भांडण थोडंच आहे.

**कामकंदला**—( हास्यमुख करून ) हें घ्या ( असें ह्मणून त्याच्या मुखकमलीं विडा घालते. )

**माधव**—(तांबूल घेऊन)प्रिये,माझ्या हातचा तांबूल प्रेमानें भक्षण कर. ( ती तसें करतांच **गिरजेस** वाजविणाऱ्या मंडळीस घेऊन येण्याची नेत्रसंकेतेंकरून खूण करते व **गिरजा** मुकाट्यानें उठून जाऊं लागते, इतक्यांत तीप्रत हंसून बोलतो:) कां, कुठें चालली आपली स्वारी?

**गिरजा**—बाहेर थोडंसं काम आहे, तें करून मी येतेंच. ( जाते. )

**कामकंदला**—( आणखी एक तांबूल देते. ) ह्या अभागिनीसाठीं आपला भरराजसभेंत अपमान होऊन आपल्यास फारच कष्ट झाले असतील, नाहीं बरं? माझीच त्यावेळेस अक्कल कशी गुंग झाली असेल ती असो. परंतु जोंपर्यंत ( त्याच्या हृदयावर हस्त ठेवून ) हें नाथरूपी द्रव्य ह्या कृपणीला मिळालं नव्हतं तोंपर्यंत "आपला तो राजसभेंत झालेला अपमान" व वनांत ह्या निर्दयीसाठीं आपल्यास जे जे कष्ट

झाले असतील ते ते मला मूर्तिमंत दिसूं लागून जें कांहीं दुःख होऊन मी आपणाकरितां विलाप केला असेल तो, प्रिया, माझी प्रिय दासी गिरजाच जाणत आहे. ती होती, ह्मणूनच हे चरणकमल ह्या भ्रमरीस प्राप्त झाले ! ! नाहीं तर पुढचा प्रसंग भयंकरच होता ! ! अस्तु ( श्वासोछ्वास टाकून ) कांहीं असो, हे अलभ्य चरण व ही सुकुमार मूर्ति अवलोकन करून त्या अनिर्वाच्य दुःखाचा विसर पडून ह्या वेळेस जो कांहीं मला आनंद झाला आहे, तो अवर्णनीय होय ! ! !

**माधव**—( हनुवटीस हात लावून ) लावण्यकलिके, वास्तविक पाहतां हा सर्व प्रताप तुझ्या दासीचा आहे. शाबास त्या दासीची ! दासी असावी तर अशीच चतुर व शहाणी असावी. मी तुजकरितां त्या वसंतविलास बागेंत रात्रचेरात्र राहून प्रातःकाळीं मुकाट्यानें उठून ग्रामांतरीं चालतें व्हावें, असा विचार करून सुमारें प्रहर रात्रीच्या सुमारास स्वस्थ पडलों. तों तुझी मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर दिसूं लागली ! मला थंडी वाऱ्याचें भय न वाटतां तुझ्या विरहानें इतकें दुःख झालें कीं, हें कामतप्त कलेवर बागेंतल्या सरोवरांत फेंकून द्यावें असें वाटलें, व त्याप्रमाणें जों सरोवरांत उडी टाकणार तों ह्या रामरूपी दासीनें अन्योक्तिरूपी बाण टाकतांच विरहरूपी दशाननाचा वध होऊन माझें मन स्थिर झालें, आणि मींही तीस तसेंच उत्तर दिलें; तों तिनें तुझें पत्र दिलें, म्हणून मी येथें येऊन मला तुझी भेट झाली ! एकंदरींत शाबास दासीची बरें ! ! ( इतक्यांत दासी सर्व वाजविणाऱ्यांसह प्रवेश करिते. )

**गिरजा**—( हंसून ) कसा काय विनोद चालला आहे ! सर्व ठीकठाक आहेना ? अजून पहाट होण्यास अवकाश आहे पण !

**कामकंदला**—बस मेले उगीच. थट्टा केल्यावांचून कांहीं तुला सुचतच नाहीं.

**माधव**—( पाहून ) बरें तें असूंदे, परंतु हें काय ?

**कामकंदला**—( अंमळ दूर बसून ) कांहीं नाहीं, यांना वाजविण्याकरितां दासीनं बोलावलं असेल दुसरं काय ?

**माधव**—( दासीकडे पाहून ) हो कांग ?

गिरजा—हो, सरकार, मींच यांना वाजविण्याकरितां बोलावलं आहे, आणखीं, बाईसाहेबांस आपलं गाणं ऐकण्याची फार उत्कंठा आहे.

माधव—( हंसून ) आपण तर पहिल्यानें गाणार नाहीं. ज्यानें इतका द्राविडीप्राणायाम केला तोच पहिल्यानें गाईल. नंतर मी मग थोडेंसें गाईन.

कामकंदला—( दासी व माधवाकडे पाहून सस्मित ) दासी, येवढंचना ? धरारे चांगला सूर, ( गाऊं लागते. )

तराना.

**तानों, तधैंना, तनन दिर दिर तानों, ॥ तनदरना दीम दीम ताता दिमतन दरना, तन दर तधैन्ना, दीम तन दीम, तदीम तो तँ तँ, तारि तर दान्नी, ॥ तानों० ॥ नादर दर दान्नी, तुंदरदर दान्नी, तननन, तन दरन दीम, तादीम, तानों, तन दरन्ना, त दीम दीम दीम तँताँ दीम तन दरन्ना, धिक्किट् धिक्किट् तक, नगधिग, धुमकिट, तध्धिडान्, धुमकिट तक धिद धिन ॥ तानों ॥ १ ॥**

माधव—( मनांत ) शाबास प्रिये शाबास! धन्य तुझा कंठ ! असें गाणें, व अशी रंभा मी आजन्मांत पाहिली नसेल ! धन्य एकूण विधात्याची ! मला वाटतें त्यानें आपली, ह्या प्रियेच्या सुकुमार मूर्तीस घडण्याकरितां सर्व अक्कल खर्च केली असावी. हिच्या सुंदर स्वरूपांत तर काय, परंतु गाण्यामध्यें सुद्धां कोणाच्यानें इच्याशीं बरोबरी करवणार नाहीं ! काय गोष्ट ! आतांच उंच स्वराची तान घेतांच सर्व शरीराचे अवयव कसे तप्त होऊन कोपाविष्टसे भासूं लागले ! काय तें स्वरूप ! काय तो आवाज ! गातां गातां नेत्रबाण तरी कसे चतुरतेनें मारते ! एकूण हे तरुणी, धन्य तूं व माझ्यासारखा धन्यही आतां ह्या लोकीं कोणी नसेल ! कारण कीं, ही अप्रातिम मदनानें लसलसित अशी सुंदर पुतळी सायास न करतां प्राप्त झाली ! आतां ह्या सुकुमारीपुढें मी तरी काय गाणार ?

गिरजा—( हंसून ) कां सरकार, आतां होऊंद्या एकदां. ( कामकंदलेकडे पाहून ) कांहो बाईसाहेब, मनीं असतं तेंच कपाळीं येतं!

माधव—बरें तर, दासीच्या ह्मणण्यास्तव आतां गातोंच तर.

कामकंदला—( दासीकडे पाहून ) दासी, केवढं पण ओझं पडलं आहे !

माधव—हं चालूंद्या तुमचें वाजवणें. (माधव गाण्यास आरंभ करितो).

**सर्गम.**

**धॅप धॅमप गम नीधा, रे गमप, रे साब्निधानिसा, गॉमा,**
**धन्निसा, गगरे सांनिधापम, गम, नीध, पमगरेसा,**
**॥ धॅप. ॥ सा, ग, म, ध, म, धानिसारे, रा॥ निधनिसा।**
**गगरेसा, निसा गमपॅग, मॅतरे सानिधानिरे, निधा निधा**
**पम गम, नीध नीध पम गम रे सा, ॥ धॅ. ॥ १ ॥**

कामकंदला—( मनांत ) शाबास प्रिय शाबास! याचं नांव गाणं. अहाहा ! मला वाटतं कीं, प्रत्यक्ष गंधर्वेंद्र जरी माझ्या जिवलगाशीं पैज लावून गाईल तरी त्यास खालींच पाहून जावं लागेल ! परमेश्वरा, धन्य आहेस तूं! माझी त्वां मनकामना पूर्ण केलीस! (पडद्यांत कामसेन) एकूण वेश्याप्रीति क्षणिक ! हा दुष्टे ! ( ती एकाएकीं भेदरून **माधवाच्या** गळ्यांत मिठी मारून रुदन करूं लागते ) शिव शिव ! आतां आपली व ह्या चांडाळणीशीं पुनरपि भेट होईल कां ! ( **माधवाची** हनुवटी धरून ) सख्या, आतां आपणास कुठं पाहूं ? ह्या चांडाळणीसाठीं आपली व्यर्थ आतां दुर्दशा होईल वाटतं ! हे दुर्दैवी **कामकंदले**, आतां तुला किती क्लेश सोसणं आहे ! दुर्दैवी खरीच बाई खरीच ! सख्या, आतां मी आपणांस कुठं लपवूं ? नाहीं हो इथं जागा सुद्धां नाहीं व काळरूपी **कामसेन** राजा दरवाज्याबाहेर खड्ग घेऊन प्रधानास-ह, आपल्या प्राणाचं हरण करण्यासाठीं आला आहे. दासी, जाग बाई दरवाज्यास तेवढी खीळ तरी घालून ये. हर हर जगन्निवासा, आतां मी काय करूं ?

माधव—( **कामसेनाचें** नांव ऐकतांच त्वेषानें ) धीर धर, घाबरूं नको. मला **कामसेन** धरून मारील ही भीति बिलकुल सोड, अशा **कामसेनांस** दाद देणारा मी द्विज नव्हें समजलीस. एखा-

दी तुझ्या महालांत तरवार असल्यास मला ती दे, मग **कामसेनास** पहातों कसा काय आहे तो. कांहीं चिंता करूं नको. जोंपर्यंत मी आहें तोंपर्यंत तुला कांडीमात्र दुःखाचा वारा लागूं देणार नाहीं. कोण आहे येथें, दासी, ती तरवार दे पाहूं. ( ती आणून देत्ये ). आतां मी काळ असो किंवा महाकाळ असो, ह्या असीलतेनें त्याचे तुकडे तुकडे करीन. सखे, आतां तूं सर्व शोकाचा त्याग करून दीनवत्सल **परमेश्व**-राजवळ जयप्राप्त्यर्थ स्तुति कर म्हणजे झालें. त्याच्या मनांत असल्यास तो तुझी माझी पुनः भेट करील. हा त्याचा सूड घेण्यास चाललों पाहा. ( असें म्हणून मोठ्या त्वेषानें **कामसेनाशीं** युद्ध करण्यास निघतो तों त्यास प्रधानादिकांसह हस्तांमध्यें शस्त्र धारण केलेला पाहतांच **माधव** त्यांस म्हणतो. )

**माधव**—( धैर्यानें ) हे **कामसेना**, उभा रहा.

श्लोक.

**राजारंजक समान होति युवती प्रीतिप्रती भूपते !**
**जेथें सद्गुण पाहुनी रमतसे तेथें वसे साच ते !**
**त्वद् खड्ग मग काय होईल तिचें ? कांहीं विचारा करी !**
**माघारीं वळला प्रवाह कधिं कां, एका नदीचा तरी ?**

**कामसेन**—हा स्त्रीलंपटा ! हें घे तुला विषयप्रायश्चित ! (त्यास-मूर्च्छित पाडतो).

**कामकंदला**—( त्याचें शिर मांडीवर घेऊन )

दिंड्या.

**सांभा सदया तूं त्वरें धांव आतां ॥**
**तुझ्या ठेवीतें, प्रभो, पदीं माथा ॥**
**किती अन्ता पाहशी जगन्नाथा ॥**
**माधवाला ऊठवी, दिनानाथा ॥ १ ॥**

**माधवा**, कसे हो ह्या अभागिनीला, सोडून चाललांत ! सख्या, मी आपला कोणता अपराध केला म्हणून माझ्याशीं आपण अबोला धरलात ! प्रिया, सावध व्हाहो सावध व्हा. ( **कामसेनास** पाहून )

अरे चांडाळा, मांगा, **कामसेना;** माझ्या तर तूं कुडींतला प्राणच घेऊन चोरासारखा चाललास, त्या अर्थी आतां कलेवररूपी ही **कामकंदला** वांचणार नाहीं. चल, कर मेल्या काळं येथून एकदांचं (रडूं लागत्ये).

**कामसेन**-(क्रोधानें **चंद्रचूडा**प्रत म्हणतो) प्रधानजी, पाहिलेंतना ह्या रांडेनें काय केलें तें ! तरी मी त्या दुष्ट द्विजाला सभेबाहेर काढून देतांच बजाविलें कीं, 'कामकंदले, जर मी तुझ्याबद्दल कांहीं वाईट पाहिलें तर मात्र तूं पूर्ण विचार कर !' परंतु माझा येवढा मोठा दरारा असतां ह्या चांडाळणीनें त्या हलकट द्विजाबरोबर, थट्टा करणें, त्यास प्राणनाथ ह्मणून हांक मारणें, उभयतांचें, गाणें त्या चांडाळ दासीचें ह्या रांडे बरोबर विनोदपर भाषण, ऐकतांच तळची आग मस्तकांत जाऊन मी त्वेषानें महालाचा दरवाजा तोडला व जयसिंगाकडून आपणास बोलावून आणविलें. प्रधानजी, मी अनुचित समयीं बाहेर जाणारा नव्हे, परंतु आज मला रंगमहालीं निद्रा येईना ह्मणून सहज नगरस्थिति पाहत, व वसंतऋतूची प्रातःकाळची गुलाबी हवा खात चाललों तों ह्या मांगणीचें गाणें अकस्मात् ऐकूं आलें ! प्रधानजी, ह्या वेळेस असें वाटतें कीं, व्याघ्राप्रमाणें हिच्या नरडीचा घोट घ्यावा, अथवा या असीलतेनें हिचे तुकडे तुकडे करावे ! ( **कामकंदलेस** ) दुष्टे, आतां तुझ्या नरडीचा घोट घेऊं, कीं, ह्या खड्गानें तुझा वध करूं? करूं तरी काय? तुझ्या जवळच हा **कामसेन** असतां त्याची भीति सोडून अशीं नीच कर्में करूं लागलीस काय ? [लत्ताप्रहार करून क्रोधानें शस्त्र मारण्यास सरसावतो तों प्रधान तें धरून ह्मणतो].

**चंद्रचूड**—हं हं सरकार, हें काय ? स्त्रीवर एकदम हात टाकणें हें आपल्यास योग्य नाहीं, ह्याकरितां, कांहीं विचार करून जें कांहीं करणें असेल तें करा. आपण तर सूज्ञच आहां.

**कामसेन**—प्रधानजी, अशा अपराधास कधीं क्षमा होणें नाहीं. चला सोडा.

**चंद्रचूड**—सरकार, तें सर्व खरें; परंतु राजाची रीत काय असते कीं, एकदां बोलून दंड करावा, दुसऱ्यानें धन हरण करून क्लेश द्यावे, नंतर तिसऱ्यानें देहांत शिक्षा द्यावी. ह्याकरितां, महाराज, ह्या वेळेस

क्षमा करून हिला व हिच्या दासीला वेगवेगळाल्या खोलींत कोंडून त्यांच्या रक्षणार्थ रात्रंदिवस खडा पहारा ठेवावा. आणि ह्या बेसावध होऊन मूर्च्छित झालेल्या द्विजास वैद्याकडून उठवून कारागृहांत कोंडून ठेवावें, ह्मणजे झालें. व्यर्थ पापाचे अधिकारी कां होतां?

**कामसेन**—( जरा शांत होऊन दूर होतो ) प्रधानजी, आपण ह्मणालां म्हणून ह्या वेळेस क्षमा केली. म्हटल्याप्रमाणें व्यवस्था आपण-च करावी. मी आतां जातों.

**चंद्रचूड**.—फार उत्तम. मी करतों सर्व व्यवस्था. आपण खुशाल जावें. (**कामसेन** जातो) **कामकंदले**! अनीतीचें फळ असेंच मिळत असतें. ह्या वेळेस मी जवळ नसतों तर व्यर्थ तूं आपल्या जीवास अंतरली असतीस.

**कामकंदला**.—( पदर पसरून ) अपराधांची क्षमा करणं तुमच्या कडेंच आहे ! आतां प्राण जावो अथवा राहो ! मी तर माधवावर अनु-रक्त झालें आहे ! करितां कृपा करा ! व माझा हिरा मला परत द्या !

**चंद्रचूड**—राजाज्ञा सर्वांस वंद्य ! म्हणून आला प्रसंग भोगलाच पाहिजे ! जयसिंग ! ह्या त्रिवर्गांस कारागृहाकडे घेऊन ये लौकर !

(जातात)

( पडदा पडतो. )

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थल—कारागृहांतील खोली.**

**पात्रें.**

**माधव**......................द्विजपुत्र.

( शृंखलाबद्ध **माधव** येतो ).

**माधव**—काय हो ? त्या चांडाळानें माझी स्थिति केली ही ! बिचारी **कामकंदला** व्यर्थ माझ्या नादीं पडून आतां डोळे पुशीत बसली! पण हा प्रसंग मलाच भोगावा लागत आहे कीं माझ्यासारखा तिलाही दासीसह भोगावा लागत आहे ? त्यानें मला मूर्च्छित केल्यामुळें पुढें काय झालें व मी येथें कसा आलों, **कामकंदला** व तिची दासी कोठें आहेत; हें कांहीं समजत नाहीं व समजण्याचा संभव व मार्गही नाहीं ! ज्या उद्देशानें मी येथें आलों तो उद्देश भलतीचकडे राहून मज अभाग्याच्या पदरीं कारागृहाचा वांटा आला ! व्यर्थ जिणें माझें ! वेश्या मोठ्या कपटी असतात ! लटकी माया दाखवून आसक्त झालेल्या पुरुषास त्या काय करतील व काय नाहीं याचा कांहीं एक नेम सांगवत नाहीं ! हें जें अनुभविक लोक सांगत आले आहेत तें खरें आहे असें आतां मला वाटूं लागलें आहे ; पण हें वाटणें काय उपयोगी ? आतां हजारदां जरी पश्चात्ताप करून मनास बोध केला तरी हें कारागृह माझ्या कपाळचें सुटतें काय ? ( किंचित् थांबून ) छिः ! पण **कामकंदला** जरी वेश्या आहे तरी ती इतरांसारखीं दुष्ट, साहसी, अधम, निर्दय,घातकी व चांडाळ नसेल. कारण,तसें असतें तर ती दासी करवीं माझा शोध करवून मला आपल्या महालीं मुळींच घेऊन येती ना. मजपाशीं काय धन होतें तें तर तिला मी सभेंत येतांनाच समजलें होतें. शिवाय मजजवळ होतें नव्हतें तें सारें मीं तिला तेथेंच दिलें.

तेव्हां धन हरणार्थ मला तिनें असें फशीं पाडलें असावें हें कधींही होऊं शकत नाहीं. सभेमध्यें जे तिनें वस्त्रालंकार घेतले ते केवळ माझा मान ठेवण्यासाठींच तिनें घेतले असें वाटतें. कारण, तिच्या महालीं जातांच मी जेव्हां पलंगावर बसलों तेव्हां तिनें माझ्या अंगावर तोच त्या चांडाळानें दिलेला शालू घातला होता. ज्या वेश्या कपटी असतात त्या आपल्या प्रियकरासाठीं फार वेळ अश्रू गाळून दुःखी होत नसतात. पण हिची गोष्ट तशी आहे कां ? तिनें मजसाठीं गाळलेल्या अश्रुजळानें थबथब भिजलेलीं कैक वस्त्रें दाखविलीं तीं प्रत्यक्ष मीं आपल्या डोळ्यांनीं बघितलीं. तेव्हां तिच्या ममताळूपणाची व शुद्धांतःकरणाची तेव्हांच कल्पना होते. शिवाय रडून रडून तिचा एक एक डोळा मुठी येवढा सुजला होता. चांपेकळीसारखें तें नाजूक नाक तांबडें लाल झालें होतें. भोंवया तर स्वभावतःच वक्र. अहाहा ! अशी ती सुंदर पुतळी, ती अनंगरामा, इतकी कठोर असेल काय ? कधीं नाहीं. मी महालांत जातांच ती लाजत लाजत खालीं मान घालून जेव्हां दूर उभी राहिली तेव्हां तर ती माझ्या **शृंगारवल्लरी**पेक्षांही अति मनोहर वाटूं लागली. तिचे ते गोंडस हात माझ्या गळ्यांत पडतांच अंगावर रोमांच उभे राहिले. माझ्या तोंडांत तो तिनें तांबूल घातला नाहीं, तर तिनें आपल्या हृदयांतील अनुरागाची प्रतिमाच काढून माझ्या हृदयांत ठेवली. तेव्हां ती इतकी क्रूर कशी असेल ? प्रिये, **कामकंदले**, व्यर्थ मीं तुला दोष दिला. पूर्वजन्मार्जितानुसार माझ्या पदरीं हें कारागृह आलें त्याला तूं तरी काय करशील? तुझें तें गाणें व तुझे ते मंजुल शब्द अझून माझ्या कर्णद्वयांत गुणगुण करतात इतकेंच नाहीं; तर हे प्रिये, तूं प्रत्यक्ष माझ्यापुढेंच उभी आहेससें वाटतें. ज्या वेळेस मीं कामसेनाशीं युद्ध केलें त्या वेळेस तुला " दे माय धरणी ठाय " झालें होतें. अस्तु. बा **माधवा**, सांप्रत तूं **कामकंदलेला** अंतरलास व **शृंगारवल्लरी** तर तिकडे कालक्रमणा करीत आहे. एकंदरींत मला दैवच अनुकूल नाहीं हें सिद्ध. मी असाच ह्या कारागृहांत आतां यमगृहाची वाट धरणार. हाय ! हाय ! कायही माझी स्थिति? ज्याच्या उमेदीवर घरीं मातापितरें कालक्रमणा करीत आहेत त्याचेंच हें वर्तमान ऐकून तीं काय करतील ? व प्रिया शृंगारवल्लरी तरी मला काय ह्मणेल ? 'स्त्री करी

जो संसार तोच बटीक करी असार!' ह्मणो म्हणेल तर. परंतु सांप्रत मला तर तिच्यापेक्षां कामकंदलाच प्रिय वाटत आहे.प्रिये,कामकंदले!

श्लोक.

ज्या शृंखळा खळळ मत्पदिं वाजतात ॥
त्यांचें मला न परि दुःखचि कांहीं होत ॥
होतें अशांत उलटें मज सौख्य भारी ॥
त्वन्मूर्ति सुंदर दिसे अति मोदकारी ॥ १ ॥
हा ! हा ! प्रिये ! तुजशिं अंतरलों उगीच
अद्यापि तें सुपरिरंभण सौख्य साच
देतें मना विफल सांप्रत कष्ट मात्र
झालें तयें शिथिल हें मम सर्व गात्र ॥ २ ॥
हे पूर्णचंद्रवदने ! तव चित्तिं साची ॥
आशा असेल तुजला, मम चुंबनाची ! ॥
होते अतां सफल सुंदरि ! ती कशाची ?
दुर्दैव तें उभयतां प्रति हाय ! जाची ! ॥ ३

( मोह पावतो. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा.

स्थळ—कामकंदलेचा रंगमहाल.

पात्रें.

कामकंदला..................वेश्या (नायिका).
गिरजा......................दासी.
दयालसिंग..................पहारेवाल्यांचा मुख्य.

( प्रवेश—कामकंदला. )

कामकंदला—( साश्रु. ) अहारे मेल्या ! चांडाळा कामसेना ! मजसारख्या अबलाजनास छळण्यांत तुला काय पराक्रम वाटत असेल

तो असो. तूंच ना वारंवार ह्मणत होतास कीं, **कामकंदले**, जीवाशीं जीव देणारासच हें मन द्यावं; हलक्या मनाच्या मनुष्याला नुसत्या वाऱ्याशीं सुद्धां उभं करूं नये. त्याप्रमाणं तो बिचारा मज अभगिनीसाठीं ज्या अर्थी आपल्या जीवावर तयार झाला होता त्या अर्थी मी आपलं मन त्या चतुर व मार्मिक पुरुषाला कां न अर्पण करावं? **कामसेना**, यांत मीं तुझा तो अपराध काय केला? व्यर्थ तूं मला द्वेषबुद्धीनं सध्यां गांजीत आहेस. त्वां घटकाभर करमणुकेसाठीं गिरजा तरी जवळ ठेवावयाची होतीस? तिलाही प्रधानजींनीं तिसऱ्याच ठिकाणीं कारागृहांत टाकलं. माझ्या प्राणविसाव्याची तरी त्या दुष्टानं काय गत केली असेल? त्यांचे ते मंजुल शब्द अझूनपर्यंत माझ्या कानांत खेळत आहेत. सरतेशेवटीं तर त्या अधमानं माझ्या **माधवास** मूर्च्छित पाडलं; काय त्यांची त्या वेळेस स्थिति झाली असेल? वेश्येच्या नादीं लागण्यानं वाईट परिणाम घडतात हें सुद्धां देवानं त्यांच्या तेव्हांच अनुभवास आणलं. माझी ह्या वेळेस ते किती निंदा करीत असतील? माझ्यावर बसलेल्या प्रीतीचा भंग तर नाहींना व्हायचा? असला चतुर पुरुष, असला देखणा बिंडा, असला प्रति गंधर्व मजवर अनुरक्त झालेला, तो जर माझ्या हातांतून गेला तर मजसारखी दुर्दैवी मीच ह्मटली पाहिजे. दासीला सुद्धां कृतकर्माचा पश्चात्ताप झाला असेल. एकंदरींत तीं दोघंही माझ्या अकल्याणाचीच इच्छा करीत असतील. देवा!

( प्रवेश—**दयालसिंग.** )

**दयाळसिंग**—बाई, झालेल्या गोष्टीस उपाय नाहीं. ज्याच्या पदरचं आपण अन्न खातों त्याच्याशीं जर अशी कपटाची वर्तणूक केली तर त्यास कां बरं राग येऊं नये?

**कामकंदला**—( डोळे पुशीत निरुत्तर बसते ).

**दयालसिंग**—मघांपासून तूं आपल्या जीवाला व्यर्थ त्रास देऊन रडत आहेस तें ऐकून मला तिसऱ्या ठिकाणीं उगीच वाईट वाटतें.

**कामकंदला**—( आशेनें ) तुझं मन जाईच्या फुलासारखं कोवळं आहे, हें मला पहिल्या पासूनच ठाऊक आहे. धन्य माझं भाग्य कीं, तूंच

माझ्या वांट्यास पहारेकरी बनून आलास. दयाळा, मजवर दया करशील कां ?

**दयाळसिंग**—(कळवळून) काय ह्मणतेस तूं ?

**कामकंदला**—दुसरं कांहीं नाहीं, मला एकदां **गिरजेची** भेट करीव.

**दयाळसिंग**—**कामकंदले,** ह्याशिवाय मी तुझें हवें तें करीन. पण राजाज्ञा उल्लंघन करण्यास मात्र सांगूं नकोस.

**कामकंदला**—मी तुला शरण आहें, शरणांगतास मरण इच्छूं नये.

**दयाळसिंग**—तें खरें, पण त्याला म्यां काय करावें ?

**कामकंदला**—**दयाळा,** तुझे मजवर अखंड उपकार होतील त्यांची मी उतराई तरी कशी होईन कुणास्कळे ! (गळ्यांतला कंठा काढून) पण सध्यां फूल नाहीं फुलाची पाकळी तरी घे ! काम झाल्यावर तुला मी आणखीं बक्षीस देईन.

**दयाळसिंग**—( लालचून, मनांत ) द्रव्याला कोण वश होणार नाहीं ? पण हें घ्यावें कीं न घ्यावें ! ( विचार करीत उभा राहतो. )

**कामकंदला**—( खिन्न होऊन. )

पद.

( नको हरी निर्शीं० या चालीवर )

**करी दया तूं मजवरि आतां; पाहुं नको रे अंताशीं ॥ ध्रु० ॥**
**दुर्दैवानें काराग्रहिं मी; दीना ऐशीं पडलें रे ?**
**कठिण नको तूं हृदय करूं हें; पाझर सुटुंदे चित्ताशीं ॥१॥**
**अंतरला मज प्राणविसावा; अंतरली मज दासी ही**
**अंतर देऊं नको तरी तूं; मजला ऐशा समयाशीं ॥२॥**

**दयालसिंग**—( स्वगत. ) काय करावें ? एकीकडे हा कंठा—तोही मोत्यांचा—व दुसरीकडे हिचा करुणपर रव ऐकून माझें मन तर अगदीं गोंधळून गेलें. आतां हिची कामगिरीच बजवावी हा उत्तम पक्ष ! शिवाय माझें हें कृत्य कोणाच्या दृष्टीसही येणार नाहीं.

**कामकंदला**—**दयाळा**, किती रे तूं कठोर हृदयाचा आहेस? तुझी इतकी विनवणी—

**दयाळसिंग**—**कामकंदले**! मी कठोर हृदयाचा आहे किंवा नाहीं हें परमेश्वरच जाणत असेल. तथापि **कामसेना**सारख्या राजाची चाकरी करून तुझ्या सारख्यांचीं राजाज्ञाविरुद्ध कामें ऐकणें म्हणजे जरा विचाराचें काम आहे. तुला काय. उचलली जीभ न् लावली टाळूला.

**कामकंदला**—बाबा रे, मला ह्या तुझ्या पुराणाचा कंटाळा आला. करणं असेल माझं काम तर घे हा कंठा न् कर एक घाव दोन तुकडे.

**दयाळसिंग**—तुझ्या आग्रहास्तव मी हा कंठा घेऊन दासीची व तुझी भेट करवितों; परंतु तिला येथें प्रहरापेक्षां फार वेळ राहूं द्यायचा नाहीं. हें कबूल असेल तर मी आणतों तिला येथें.

**कामकंदला**—नको ठेवूं बाबा. पण एकदां तिची माझी भेट तर कर.

**दयाळसिंग**—ठीक आहे. (जातो.)

**कामकंदला**—देवाच्या दयेनं मला दासी तरी मोठी चतुर मिळाली, म्हणून मला **माधवा**च्या भेटीची पुन:पुन्हां आशा उत्पन्न होते. तिनं जर मनावर घेतलं तर ती युक्ति प्रयुक्तीनं माझ्या जिवलगाला खास मुक्त करून इंथ घेऊन येईल. पण देवा! ते चांगले शुद्धीवर तरी आले असतील काय? कारण, ते मूर्च्छित पडले असतांच प्रधानजीनं त्यांनां कारागृहांत कोंडून ठेवलं. तिथं त्यांनां सावध तरी कुणीं केलं असेल? जखम लागल्या ठिकाणीं कुणीं औषध तरी लावलं असेल काय? निजणं तर भुईवरच होत असेल कीं, काय; कोण जाणं! तिथं त्यांनां कसली गादी न् कसलं काय! ध्यानीं मनीं तेवढी मी भरली असेन. कारण, हा प्रसंग माझ्याच मुळं त्यांना आला! मजवर ते रागें भरले असतील. माझ्यावरची त्यांची माया उडाली असेल. व 'व्यर्थ मी कारागृहांत पडलों' म्हणून माझी निर्भर्त्सनाही ते करीत

असतील ! ! ! **गिरजा** तरी काय त्यांचीच या वेळेस जोडेकरीण बनली असेल. तेव्हां तीहि माझं काम ऐकेल कीं नाहीं याची मला भ्रांतिच आहे.

**गिरजा**—( प्रवेश करून ) छेः ! छेः ! असं मात्र आपण, बाई-साहेब, समजूं नका.

**कामकंदला**—( नेत्र उघडून तिच्याकडे पहाते व कंठ सद्गदित करून एकदम तिच्या गळ्यास मिठी मारल्ये ) अहाहा ! कोण आहे ? दासी ? बये, तूं कुठंग इतका वेळ होतीस ? माझ्याकरतां तुला व **माधवांना** कारागृह पाहवं लागलं काय ? खरोखर माझ्या-सारखी चांडाळीण ह्या पृथ्वींत कोणी नसेल. ( तिच्या गुढघ्यांत डोकें घालून ) सखे, ज्याप्रमाणं तूं परवां त्यांची माझी युक्तिपरयुक्तीनं भेट करविली तशीच प्रिये, आतां कर म्हणजे झालं. **गिरजे**, तुझे उपकार मी सर्व स्मरत आहें. सध्यां मी कांहीं एक करूं शकत नाहीं. परमेश्व-राच्या मनांत असल्यास, तुझी मनकामना हवी तशी पूर्ण करीन. मी आपल्या चर्मवस्त्राची जरी चोळी करून तुझ्या अंगांत लेव-विली तरी तुझ्या अनेक उपकारांची मी ऋणीच राहीन. शिव शिव ! शंकरा, नको आतां दीन कन्येचा अन्त पाहूं. दासी, कसंही करून, भेट तर राहिली,परंतु सख्याची त्या यमसदनांतून युक्तीनं सुटका तरी कर म्हणजे झालं. प्रारब्धीं असल्यास ईश्वरकृपेंकरून पुनः उभयतांची भेट होईल.

**गिरजा**—( किंचित् विचार करून ). बाईसाहेब, मी आपणास त्यांच्या भेटीचं तर वचन देत नाहीं, परंतु इतकं निःसंशय सांगतें कीं, मी युक्तीप्रयुक्तीनं सरकार **माधव**रायास त्या बंधनांतून पार करवीन, परंतु आपण त्रिवर्ग सांप्रत कैद्यांत जमा आहों, करितां **दयाळसिंगास** आपण आणखीं थोडीशी लांचदेऊन माझ्या ठिकाणीं दुसरी बाई ठेवावयास सांगावं, व ही गुह्य गोष्ट प्रकट न होतां गुप्तरीतीनं पार गेली तरच मजा, नाहीं तर मग आपण दुप्पट फजितीस व क्लेशास पात्र होऊं. सरकार, मला आपण त्या का-र्याकरितां नुसती दोनच दिवसांची मोकळीक द्यावी म्हणजे बरं पडेल.

आतां आपणास म्हणणं येवढंच कीं, आपण त्या यमसदनाची दक्षता घेत जावी, कारण न जाणों कधीं त्या चांडाळाची स्वारी येईल.

**कामकंदला**—( हर्षानें ) प्रिये, हें दुर्घट कार्य निःसंशय तडीस नेशीलना ? नाहीं तर 'ज्याच्या तंगड्या त्याच्याच गळ्यांत' असं न होवो. कारण, सध्यां आपणास काळच प्रतिकूळ आहे. असो, ( इकडे तिकडे पाहून ) बा **दयाळसिंगा**, इकडे तर ये.

**दयाळसिंग**—ओ ! हा आलों ! सेवेंत हजर आहें आपल्या !

**कामकंदला**—कृपाकरून ह्याही द्रव्याचा स्वीकार कर ! व माझं आणखी एक काम ऐक !

**दयाळसिंग**—( तें द्रव्य पाहून मनांत ) आतां तर माझ्यासारखा सुखी कोणी नाहीं. घर बसल्या एक हजार होन मिळताहेत ते कां सोडा? ( उघड ) बाईसाहेब, काय आज्ञा आहे ती करावीत. केला मीं ह्या द्रव्याचा स्वीकार.

**कामकंदला**—दुसरं कांहीं नाहीं. फक्त दोन तीन दिवस दासीच्या जागीं दुसरी एखादी स्त्री आणून ठेव. अथवा हवी तशी व्यवस्था ठेव, मात्र **गिरजा** कारागृहाच्या बाहेर पडली ; हें कोणास समजूं देऊं नकोस.

**दयाळसिंग**—त्याविषयीं आतां आपण बिलकुल काळजी करूं नये.

**कामकंदला**—ईश्वर तुझं कल्याण करो ! ( द० सिं० जातो. ) दासी, जें दुर्घट काम होतं तें तर उरकलं. आतां सर्व तुझ्या कडेसच आहे. सखे, मीं तुला जास्त सांगावं असं नाहीं, परंतु हुशारीनं करावसं म्हणजे झालं.

**गिरजा**—सरकार, आपण आतां निष्काळजी असा. आणीन तर संतोषाचीच बातमी आणीन नाहीं तर तुमची माझी हीच भेट.जातें आतां.

**कामकंदला**—बाई जा, पण संभाळून ऐस हो. तुला परमेश्वर साह्य होऊन तुझं काम शेवटास जाईल. ( दासी गमन करते ).

( सर्व निघून जातात. )

---

## प्रवेश ३ रा.

स्थळ—देवनगरींतली राजसभा.

पात्रें.

**कामसेन**......................देवनगरीचा राजा.
**चंद्रचूड**......................प्रधान.
**ज्ञानशर्मा**......................एक द्विज.
**जयसिंग**......................राजसेवक.

**कंचुकी**, शिष्ट मंडळी, **माधव**, इत्यादि.

( **कामसेन** वगैरे प्रवेश करतात. )

**कामसेन**—( दुःखानें ) मित्रहो ! आज आपणांस एक अत्यंत दुःखाची गोष्ट कळवावयाची आहे ! ( इकडे तिकडे पाहून ) अरे पण अजून प्रधानजी कां नाहीं आले ?

**कंचुकी**—महाराज ! ते पहा येतच आहेत !

**चंद्रचूड**—( येऊन ) नरदेवाचा जयजयकार असो.

**कामसेन**—प्रधानजी, आपणांस आज जरा विलंब लागला ?

**चंद्रचूड**—विलंब लागण्याचें कारण अजून महाराजांच्या स्मरणांतून गेलें नसेलच ?

**कामसेन**—नाहीं ! पण त्याप्रमाणें जिकडची तिकडे सारी व्यवस्था तर लागली ना ?

**चंद्रचूड**—तिला तिच्या महालांतच बंदोबस्तानें ठेविलें आहे. तिच्या दासीला वेगळ्या खोलींत पाहऱ्यांत ठेविलें आहे; व त्या स्त्रीलंपटास तर आपलें जें मोठें कारागृह आहे त्यांत कोंडून, शिवाय त्यावर मात्र सक्त पाहरा ठेवला आहे ! त्या दोघींच्या निगेवर **दयाळसिंगाची** नेमणूक करून हा असाच इकडे आलों.

**कामसेन**—( संतोषानें ) शाबास प्रधानजी. दुष्टांस हीच शिक्षा योग्य आहे !

**सर्व**—महाराज ! आपली अत्यंत दुःखाची गोष्ट व आपलीं हीं उभयतांचीं भाषणें ऐकून आह्मी सारे फार घोंटाळ्यांत पडलों आहोंत ! कृपा करून महाराजांनीं त्यांचा उलगडा करावा !

**कामसेन**—( सुस्कारा टाकून.) मित्र हो ! काय सांगावें ? गोष्ट होऊं नये पण होऊन गेली ! आज आपल्या नृत्यशाळेचें सारें वैभवच आपल्या हातचें जाणार होतें !

**सर्व**—ह्मणजे ?

**कामसेन**—सुतावरून स्वर्ग गांठणाऱ्या मित्रजनांस येवढेंच सांगणें पुरें आहे कीं, जिच्या मधुर कंठांत गायनकला सदांसर्वदां प्रसन्नमुद्रेनें नृत्य करीत असते तीच **कामकंदला** काळरात्रीं एका हलकट द्विजपुत्राचा हात धरून जाणार होती ! बाकीचा मजकूर सांगणें मला प्रशस्त वाटत नाहीं !

**सर्व**—शिव ! शिव ! फारच अनुचित् गोष्ट होणार होती !

**कामसेन**—पण ती झाली नाहीं यांतच थोडा आनंद माना !

**कंचुकी**—महाराज ? बाहेर एक वृद्ध ब्राह्मण मोठ्या आशेनें उभा आहे ! तो ह्मणतो मला महाराजांची भेट घेणें आहे !

**कामसेन**—जा त्याला आंत घेऊन ये !

( **कंचुकी** त्यास घेऊन येतो. )

**कामसेन**—( त्यास नमन करून आसनावर बसवितो. )

**ज्ञानशर्मा**—( हात वर करून. )

श्लोक.

**त्वत्कीर्ती पसरून सर्व जगिं ह्या दाटो नृपा ! शुभ्रता**
**त्वद्राज्यांतुनि कृष्णपक्ष सगळा जावो लया तत्वता !**
**त्वभ्दार्या प्रसवो सुपुत्र उदरीं चंद्रापरी सत्वरीं**
**पाळो कुंभिनि थोर ही अशिच तो, त्या चंद्रहास्यापरी! १**

**कामसेन**—( संतोषानें ) तथास्तु महाराज !

**ज्ञानशर्मा**—राजा, माझें नांव **ज्ञानशर्मा**. बालपणीं वेदाध्ययन करून तरुणपणीं संसारसुखाचा अनुभव घ्यावा व वार्धक्यांत आपल्या

मुलाबाळांचें सुख अवलोकन करीत स्वस्थ 'हरि हरि' ह्मणत बसून आह्मांसारख्या वृद्धांनीं कालक्षेप करावा; हीच साधारणत: संसारपर्यवसनाची राहटी असते !

**कामसेन**—खरें आहे !

**ज्ञानशर्मा**—परंतु नीट विचार करून पहा: ह्या जगांत कोणती गोष्ट सुरळीत चालली आहे ?

**कामसेन**—पंचमहाभूतांखेरीज सुरळीत चाललेल्या गोष्टी फार थोड्या आहेत !

**ज्ञानशर्मा**—तथापि तीं पंचमहाभूतें सुद्धां राहून राहून क्रोधाच्या अगदीं पूर्णपणें आधीन होतात ! व नाहींनाहीं ते जगांत प्रलय करून सोडतात ! एखाद्या ज्वालामुखी पर्वतानें जर पेट घेतला तर तो जगाची किती नासाडी करतो; पहा ! त्या पर्वताच्या असमंतात्भागीं पन्नास पन्नास योजनें दूर राखेचे मोठमोठाले पर्वत पसरतात ! नदी, नाले व सरोवरें अगदीं कोरडीं ठणठणीत पडून त्यांचा मागमूसही नाहींसा होऊन त्यांवर, जळत असलेल्या धात्वादिकांचे इंगळासारखे तांबडेलाल ढीग पडतात ! जणूं काय सर्व जगावरच विश्वभक्षक काळ आपले डोळे वटारीत आहे ! अशाच एखाद्या ज्वालामुखीनें जर समुद्रांत पेट घेतला तर-मग तर कांहीं विचारूंच नकोस ! अहाहा ! राजा ! असले प्रसंग केवळ कानांनींच मात्र ऐकावे ! एकीकडे राखेचे पर्वताकार लोळ आकाशांत उंच उडून समुद्रांत एकामागें एक पडत आहेत ! व दुसरीकडे त्या जलसमूहाच्या अतिभयंकर लाटा अग्नितापानें ऊष्ण होऊन भडाभड उसळत आहेत ! ह्या अग्नीच्या अशा भयंकर प्रकोपानें मोठमोठालीं बेटें जळून खाक होऊन नाहींशीं होतात व समुद्रांतही मोठमोठाले खळगे पडतात ! अशा समयीं जलचरांची व बेटावर असलेल्या स्थलचरांची काशी दाणादाण होत असेल व किती दैवदुर्विलासी आपल्या प्राणास मुकत असतील ह्याचा तूंच विचार कर ! राजा ! भूकंपानें व पवनाच्या प्रचंड प्रकोपानें केलेले अनर्थ तुझ्या कांहींच ऐकण्यांत नाहींत काय !

**कामसेन**—आहेत ज्ञानशर्मन् !

**ज्ञानशर्मा**—तेव्हां बा कामसेना ! अबाधितपणें कोणतीही गोष्ट

[illegible] चाखणें फार कठीण आहे! पंचमहाभूतांचीदेखील ही अवस्था तेव्हां मग आपली काय [illegible]? तशांतून आपण यःकश्चित् मानव!

**काममेन**—[illegible] आहे द्विजराज!

**ज्ञानशर्मा**—[illegible] तो तरी जगाबाहेर आहे कां?

**काममेन**—नाहीं!

**ज्ञानशर्मा**—( उसासा टाकतो ) शिव! शिव! हरीची माया कांहीं विलक्षण आहे!

**चंद्रचूड**—( स्वगत ) अरे इश्श्या! येथें कांहीं तरी गोम आहे!

**काममेन**—[illegible]! अधिक बोलतों याची क्षमा असावी! आपण जें आतां भाषण केलें तें फारच मनोहर व श्रवणीय होतें! तथापि बोलतांना मधून मधून आपले नेत्र दुःखाश्रूंहीं भरून येत! कंठ सद्गदित होई! व [illegible] तर अजून अजूनही चालले आहेत! कोणतें असें आपणास संकट पडलें आहे तें दासास निवेदन करावें! शिवाय [illegible] मनीषा पूर्ण करणें हा माझा धर्मच आहे!

**ज्ञानशर्मा**—( सानंद ) सत्य आहे! राजेंद्रा, तूं अत्यंत चतुर आहेस! तथापि माझी इच्छा तृप्त करणें तुला फार—फार कठीण जाईल!

**काममेन**—[illegible]! आपण असल्या शंका मनांत आणूं लागल्यास माझा निरुपाय आहे! फार तर काय? पण द्विजराज! आपल्या-[illegible] मनोरथ पूर्ण करण्यांत प्रत्यक्ष माझ्या प्राणावर जरी येऊन बेतलें तरी बेहेतर आहे! आतां मात्र आपण अनमान न करावा!

**ज्ञानशर्मा**—हाय! हाय!

**श्लोक.**

**गृहीं ज्याची माता निशिदिनि अहाहा! रडतसे!**
**तशी यद्भार्याही प्रियकरवियोगें झुरतसे!**
**जयाचांचोनीयां सुत मज नसे कोणि दुसरा!**
**कळेना कोठें तो भटकत फिरे हे नृपवरा!!**

**काममेन**—[illegible] ना! कांहीं हरकत नाहीं! आपल्या पुत्राचा शोध लागल्याखेरीज मी आपणास मुळीच जाऊं देणार नाहीं!

**ज्ञानशर्मा**—( सद्गदीत ) राजा ! हें खरेंच ना ? यांत अंतर तर पडणार नाहीं ?

**कामसेन**—नाहीं !

**ज्ञानशर्मा**—पुत्रमोह मोठा वाईट असतो ! ह्मणून तुला पुनःपुन्हा विचारतों !

**कामसेन**—द्विजराज ! आमच्यासारख्यांस सर्पाप्रमाणें दोन जिव्हा नसतात !

**ज्ञानशर्मा**—नाहीं; पण मज म्हाताऱ्यास त्वां एकदां वचन दिलेंस ह्मणजे माझा जीव खालीं पडेल !

**कामसेन**—( हंसून ) ठीक आहे ! ( त्याच्या हातावर हात मारतो ) आतां तर आपली खात्री झाली ना ?

**ज्ञानशर्मा**—खात्री तर झाली ! परंतु—

श्लोक.

**असेल सुत तो तुझ्या नगरिं सांप्रतीं हे नृपा !**
**विनंति करितों तुला करि तयावरी तूं कृपा !**
**कळे न मजला कसें छळित त्यास दुर्दैव हीं !**
**जयें करित वास तो मुळिं तुझ्याच कारागृहीं ! !!**

**कामसेन**—( साशंक ) अरेरे ! तो **माधव** तर नसेलना ? असेल तर मी अविचारानें मोठाच प्रमाद केला ह्मणायचा ! असो. **कामकंदले**-चा चांगला समाचार घेतला ह्मणजे झालें ! ( उघड ) आपल्या पुत्राचें नांव **माधव** तर नाहींना ?

**ज्ञानशर्मा**—( सद्गदीत )

श्लोक.

**ज्याचीं विशाल नयनें कमलासमान !**
**प्रत्यक्ष ज्या मदन सुंदर देई मान !**
**जो आळवी सतत कोमल राग मात्र !**
**तो होय माधव नृपा मम साच पुत्र ! ! ! १.**

**कामसेन**—आपल्या इच्छेप्रमाणें त्यास मी मुक्त करतों ! परंतु आपली आणखी कांहीं इच्छा आहे काय ?

**ज्ञानशर्मा**—दाता जर देता असेल तर याचक तरी घेता कां न होईल ! तूं ह्मणतोस तर आतां येवढें कर !

**श्लोक.**

**कारागृहीं असति जे तव पट्टणांत !**
**सोडी कृपा करुनि ते सगळे त्वरीत !**
**देवो तुला अतुल ईश्वर सौख्य देवो !**
**कीर्ती दिगंतिं तवही बहुसाल जावो ! १.**

**कामसेन—जयसिंग** ! द्विजराजांची आज्ञा मान्य कर ! व **माधवास** लौकर घेऊन ये !

**जयसिंग**—आज्ञा सरकार ! ( जातो. )

**चंद्रचूड**—( मनांत ) ह्या ब्राह्मणाच्या एकंदरींत भाषणाच्या कलावरून पहातां माझ्या मनांत भलभलत्या शंका येतात ! पुरुष कितीही कोमल, जीर्ण किंवा नामर्द असो; त्याच्या भाषणाचा नैसर्गिक रांठपणा कधींही जायचा नाहीं ! तद्वत् स्त्रीचीही गोष्ट होय ! ती कितीही क्रूर, साहसी, बेश्रम, बिलंद, अट्टल छकेपंजेबाज व तोंडाची फटकळ असो; तिच्याही भाषणाचा नैसर्गिक मृदुपणा कधीं लोपायचा नाहीं ! ह्या द्विजाकडे मघांपासून मी जों जों लक्ष्य देऊन पाहतों तों तों माझ्या शंकेस जास्त बळकटी येतजाते ! तो वक्षस्थलावरील उच्च प्रदेश, त्या काळ्याभोर कमानदार भिवया, तो लांबसडक केशकलाप वगैरे पाहून माझी तरी पक्की खात्री झाली ! हा द्विज नव्हे ! ही स्त्री आहे ! **कामकंदलेची गिरजा** अत्यंत चतुर आहे. ती तर ही नसेल ? **माधव** कारागृहांत पडला हें वर्तमान त्याच्या बापास इतक्या थोड्या अवधींत कसें समजलें ? **गंधर्वपुरीचें** व **देवनगरीचें** अंतर कांहीं नाहीं तरी निदान सात आठ योजनें असेल ! यदाकदाचित् त्याच्या बापास हें वर्तमान अंतर्ज्ञानेंकरून समजलें असें जरी मानलें तरी हा यष्टी धरून चालणारा वृद्ध ब्राह्मण आजच येथें येऊन असलें भाषण करील ह्मटलें

ह्मणजे पिपीलिकेनें सागर शोषून टाकणें होय! विशेष चमत्कार हा कीं ही शंका आमच्या महाराजांचे मनांत कशी अजून आली नाहीं? आतां मी जर मोठ्यानें बोलून ह्या द्विजरूपी **गिरजेचा** उपहास करावा तर माझें मलाच वाईट वाटणार आहे! कारण **कामकंदला** मला शरण आली आहे! तशांतून शरणागतावर शस्त्र धरणें ह्यासारखा दुसरा अधमपणाही नाहीं! ह्यासाठीं आपण सांप्रत तोंडाला कुलूप घालून जें जें होईल तें तें पाहूं; ह्मणजे झालें!

**प्र० हा०**—सकल क्षात्रवीर मुकुटमणि महाराज!

**चंद्रचूड**—**प्रतिहारा!** कांरे बुवा शब्द केलास?

**कंचुकी**—( पुढें येऊन ) **माधवास** घेऊन **जयसिंग** बाहेर उभा आहे!

**कामसेन**—प्रधानजी, त्यास आंत येऊं द्या!

( प्रवेश—**माधव** व **जयसिंग** )

**कामसेन**—हेच **माधव** आपले पुत्र ना?

**ज्ञानशर्मा**—( त्यास आलिंगन देऊन )

### श्लोक.

**ज्याचीं विशाल नयनें कमलासमान**
**प्रत्यक्ष ज्या मदन सुंदर देह मान!**
**जो आळवी सतत कोमल राग मात्र**
**तो होय माधव नृपा! मम हाच पुत्र! १**

**कामसेन**—( **माधवास** आसनावर बसवितो. )

**ज्ञानशर्मा**—( स्वगत ) आग बाई! हे तर माझ्या चेहऱ्याकडे संशययुक्तमुद्रेनं पाहूं लागले! ह्यांची ही शंका लौकर घालवून मी कोण आहें हें ह्यांनां कळवीलं पाहिजे! ( उघड ) बाळा! असा घाबरूं नकोस! हें दिनमान फार विचित्र आहे! त्याचा तुला मी एक चमत्कारिक मासला दाखवितों!

अंजनी गीत.

अंतरतां ती स्वप्रियकरणी
आणुनियां तल्लीला स्वमनीं !
चक्रवाक हा रडत बसोनी
तीतें आळवीत ! १
ती हि तशी स्वप्रियकर योगें
अश्रु ढाळिब बसली स्वभोगें !
उभयतांच्या ते संयोगें
सुखि नच परि होती ! ॥ २ ॥

**माधव**—( मनांत ) अहाहा ! **गिरजे** ! धन्य तुझें चातुर्य ! तूंच मला कारागृहांतून मुक्त केलेंस ! व हें सारें त्या **कामकंदले**च्या दृढ-प्रेमाचें फळ होय ! मलासुद्धां प्रथमदर्शनीं अशी शंका आली कीं, असे आमचे विचित्र व अनोळखी वडील येथें कशाला आले ! ! ! (उघड ) त्यांत चमत्कार तो कसला ?. कारण तोच चक्रवाक पुन्हां रजनीला उद्देशून ह्मणतो—

श्लोक.

तुझी वाणी वाटे कितितरि मला गोड रजनी !
परी दुर्दैवानें वसत शशि हा जोंवर जनीं !
तदाशा भेटींची विफळ दिसते तोंवर सये !
ह्मणोनी तीं दोघें रडत बसलीं तच्छशिभयें ! १

**ज्ञानशर्मा**—खरें आहे !

**चंद्रचूड**—( स्वगत ) आतां तर माझी पुरती खात्री झाली !

**कामसेन**—**ज्ञानशर्मन्** ! मी आपला महदापराधी आहें ! योग्यताभावीं मजकडून हा प्रमाद घडला !

**ज्ञानशर्मा**—ईश्वर तुला त्याची क्षमा करो !

**माधव**—( त्वेषानें, स्वगत. ) निदान मी तरी करणार नाहीं !

**कामसेन**—( स्वगत ) अरेरे ! हा स्त्रीलंपट हातचा निसटला ! असो. ह्यास झालेल्या शिक्षेंतच संतोष मानावा. व तिचाही त्यास

आतां विसर पडणार नाहीं ! शिवाय यःकश्चित् ब्राह्मणाच्या पोराशीं म्यां वैर तें काय करावें ? ( उघड ) तथास्तु. **जयसिंग** ! ह्या उभयतांस माझ्या दिवाणखान्यांत नेऊन बसीव !

**ज्ञानशर्मा**—छिः ! छिः ! राजा ! ह्या भानगडींत तूं पडूं नकोस?

**कामसेन**—तें कांहीं नाहीं ? निदान आपण तरी माझ्या वचनास मान देऊन माझ्या घरीं दोन घांस खाल्लेच पाहिजेत? चला तर उठा !

**चंद्रचूड**—आज आमचे राजे साहेब खुष आहेत ? यंत्र ! ( उठतांना स्वगत. ) दुनिया झुकती है ! झुकानेवाला चाहिये ! !

( जातात. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ४ था.

### स्थळ—रतिप्रियेचा रंगमहाल व सुवर्णवसंत बाग.

पात्रें.

**कामसेन**........................राजा.
**रतिप्रिया**........................राजस्त्री.
**चंपकमालती**..............तिची सखी अ. प्रधान कन्या.
**वसंती**............................रतिप्रियेची दासी.

( **रतिप्रिया** व **चंपकमालती** बागेंत येतात. )

**रतिप्रिया**—(हळू हळू चालत.) सखे ! ह्या बागेंतली शोभा पाहिलीसना? किती चांगली दिसते ती? सगळ्या फुलझाडांना टवटवीत फुलं आलीं आहेत ! त्यांच्या वासानं हे भ्रमर अगदीं दंग होऊन फुलझाडांभोंवतीं रुंजी घालतात. ( स्पर्शसुख अनुभवून. ) अहाहा ! ह्या वेळेस मंद वाऱ्याची झुळुक लागतांच मला जो कांहीं आनंद झाला तो सांगतां येत नाहीं! पण—अग बाई! हें काय मेलं ?—तावडतोब माझ्या अंगाचा दाह कशानं होऊं लागला !

**चंपकमालती**—(मनांत) ज्यावर मी आसक्त झालें त्याच पुरुषावर हिचं मन गेलं वाटतं! पण आतां मी हिला उत्तर तरी काय देऊं ही आहे विवाहित व मी आहे अविवाहित! तेव्हां मी त्या पुरुषांवर अनुरक्त झालें हें कांहीं बावगं नसून हिचं मात्र त्या पुरुषांच्या ठिकाणीं चित्त गुंतल्यामुळं पापाचं कारण झालं! याला मी तरी बाई काय करावं? तथापि ही राजस्त्री पडल्यामुळं हिच्यासारखं मला बोलणं भाग आहे! (उघड) अग! रात्रंदिवस मी तुझ्या जवळच राहणारी! तेव्हां मला तुझ्या मनोविकाराची परीक्षा करतां येऊं नये तर यावी कुणाला? (तिच्या कानांत कांहींसें सांगून.) कां हेंच कारण ना!

**रतिप्रिया**—(उल्हासानें)

**दिंडी.**

**सुधारस ह्या तव गोड वाणि-भाजीं**
**असे भरलेला वाटतें मला; जी-**
**ऐकुनीयां मन गार गार झालें**
**परी सुख हें गे! क्षणिक होय मेलें १**

**चंपकमालती**—(स्वगत) आतां तर माझी पुरतीच खात्री झाली!

**रतिप्रिया**—(उसासा टाकून.) ज्यानं माझं कुमारिकापण हरण केलं! ज्याच्या बरोबर वैशाखासारख्या आनंददायक चांदण्या रात्रीं नानाप्रकारचे विलास भोगले! जो मला प्रेमाची सृष्टी समजत आहे! जो मला तळहातावरच्या फोडाप्रमाणें झेलीत आहे!—काय ह्या मेल्या मदनाचा प्रभाव पहा!—आज माझ्या मनांत त्याच माझ्या प्राणनाथाविषयीं तिरस्कार उत्पन्न होऊन हा देह त्या द्विजपुत्रास अर्पण करावा; असें आलें आहे इतकंच नाहीं तर त्या मनमोहनास इथं आणवून आजच त्याबरोबर क्रीडा करावी!!

**चंपकमालती**—(मधेंच) अग! बायकांनीं लाज सोडून असं बाष्कळ बोलूं नये! देवानं तुला नवरा कांहीं वाईट दिला नाहीं! त्याच्याशीं जर तूं अशी प्रतर्णा करशील तर बाई ग! ह्या पापाचे झाडे देशील कुठं? हेंच जर तुझं भाषण दुसऱ्या कोणी अथवा तुझ्या नवऱ्यानंच ऐकलं असतं तर?

**रतिप्रिया**—सखे ! तूं कांहीं ह्मण ! पण !—अहाहा ! त्या द्विज-पुत्राचं तें सुंदर स्वरूप पाहून निर्दय मदनानं माझ्या उरांत खंजीरच खुपसला !

**चंपकमालती**—रतिप्रिये ! समुद्र जरी येवढा मोठा आहे; तरी तो आपली मर्यादा उल्लंघीत नसतो ! त्यांतून तूं तर यःकश्चित् बायको !—डोंगरापुढं मोहरी सुद्धां शोभायची नाहींस ! आन् त्या तुला, मी तुझी मैत्रीण झालें तरी काय झालं ?; माझ्या सुद्धां पुढं अशी मर्यादा टाकणं योग्य नाहीं !

**रतिप्रिया**—तुला अजून माझ्या इतके पावसाळे गेले नाहींत ! व तूं अजून अविवाहिताच राहिल्यानं कुसुमायुधाच्या तावडींत सांपडली नाहींस ! ह्मणून ह्या साऱ्या गोष्टी !

**चंपकमालती**—( संतापून ) पुरें आतां ! जास्त पावसाळे गेले ह्मणून असे चाळे करायला लागलीस वाटतं ! उजेड त्या कुसुमायुधाचा न् तुझा ! तूं आपला थोरपणा टाकून माझ्याशीं अशीं अनीतिकारक वेडीं विचकीं भाषणं करशील हे मला समजतं; तर मी तुझी भेटच घेण्यास आलें नसतें ! ही सारी थट्टा असेल ह्या भरंशावर मीही तुला ह्मटलं कीं भरला असेल कदाचित् तो द्विजपुत्र तुझ्या मनांत ! पण तूं तर त्याचा एकसारखा हट्टच धरून बसलीस ! बाईग ! हें चांगलं नाहीं !

**रतिप्रिया—चंपकमालती** ! ज्या त्या मनुष्यानं आपली पायरी लक्ष्यांत धरावी आणि मग पुढं जीभ लांब करावी ! माझ्या थोरपणाशीं व वेड्याविचक्या भाषणाशीं तुला कांहीं एक कसवयाचं नाहीं ! माझा तुला कंटाळा आला असल्यास तूं जा बापडी ! मीं कुठं तुला अडवून धरलं आहे ! हें चांगलं असो; वाईट असो ! करीन तसं भोगीन मीच ! तुला कांहीं मीं ह्मणायला यायची नाहीं कीं, **चंपकमालती** ! माझ्या पापाची तूं वांटेकरीण हो ह्मणून ! माझी मालकीण मी !

**चंपकमालती**—बरं बाई ! जिकडून तुला सुख होईल तसं तूं कर ! माझी तुला ना नाहीं ! त्या द्विजपुत्राला तुझ्या इथून गेल्याला बरेच दिवस झाले ! तेव्हांपासून तुझ्या मनोवृत्तींत जमीन अस्मानचा फरक पडला ! माझ्या भाषणानं तुला आतां कंटाळा येईल खरा;

पण पुढें तेंच तुझ्या उपयोगीं पडेल ! असेल तें ऐकण्याची तुला इच्छा तर ऐक ! नाहीं तर दे मला निरोप ! माझं सुद्धां मघापास्नं कपाळ दुखायला लागलं आहे ! तुझा माझा फारा दिवसांचा ऋणानुबंध आहे ह्मणून ह्मणतें ! याउपर मर्जी तुझी !

**रतिप्रिया**—बाईग ! मी आहें भडभंड्या स्वभावाची ! पण पक्क्या निश्चयाची ! करीन तें तडीस नेईन ! हें लक्ष्यांत ठेवून जें कांहीं तुला बोलायचं असेल तें बोल ! पण कशाला उगीच त्रास करतेस ! कारण आधींच तुझं कपाळ दुखतं आहे ! त्यांतून तुला बोलण्याचे श्रम झाले तर तें जास्त दुखूं लागेल ! याकरतां जा तूं आपली घरीं!

**चंपकमालती**—जातें ! पण सखे ! देवानं जो तुला पति-दिला आहे त्याचीच सेवा कर ह्मणजे तुला कशाचीही उणीव पडणार नाहीं !

( **वसंती** येते. )

**वसंती**—सरकार ! महाराजांची स्वारी मघापास्नं आपली वाट पहात बसली आहे. लौकर चला.

**रतिप्रिया**—मेले ! मग लौकर कां नाहीं आलीस सांगायला ! (जातांना **चंपकमालतीस** ) बाई ! राग धरूं नका हो बोलण्याचा !

**चंपकमालती**—( हात जोडून ) माझीही आपणांस तीच प्रार्थना आहे !

**रतिप्रिया**—( **वसंती**सह जाते).

**चंपकमालती**—( आपल्याशीं ). **रतिप्रिया** माझी मैत्रीण खरी ! तथापि तिची अशी चलबिचल झालेली पाहून मला फार वाईट वाटतं! व ही चलबिचल तिच्या संसाराचा पुढं काय काय खेळखंडोबा करील तो करो ! माझं भाषण तिला विषासारखं कडू लागल्यामुळं माझा तिला फारच राग आला आहे ! माझ्या पथ्यावरच आहे तो ! कारण असल्या हलक्या दिलाच्या स्त्रियांची मला मुळींच संगत नको ! येवढं तरी बरं आहे कीं, तिला दुसऱ्याच्या मनाची हवी तशी परीक्षा करतां येत नाहीं ! ती भाबडी तर खरीच ! जसा मीं तिच्या मनोवृत्तीचा कल ओळखला तसा तिनं माझा ओळखला नाहीं ! कामविकार म्हणजे काय

हें मला सुद्धां अजून माहित नव्हतं! पण **माधवरावांचं** तें सुंदर रूप पाहून माझीसुद्धां जेव्हां चलबिचल झाली तेव्हां **रतिप्रियेसारख्या** सुरत-संगरार्थ पात्र झालेल्या स्त्रिया; आंतले आंत कामानं विव्हल झाल्या; यांत नवल तें काय! **कामसेनानं माधवरावांस** जेवायास बोलावून मला व **रतिप्रियेला** त्यांचं ताट वाढण्यास लावलं, हे तरी त्याचे माझ्यावर अनंत उपकारच झाले म्हणायचे! अहाहा! त्यांचं स्वरूप तर माझ्या मनांत फारच भरलं आहे! ते पाणीदार डोळे, तें हास्यवदन, तें विशाळ कपाळ, ती रुंद छाती, अजून माझ्या डोळ्यापुढं दिसते!! देवानं मला ह्या पुरुषावर अनुरक्त केलं खरं! पण ही गोष्ट बाबांच्या मनास कशी येणार? जो स्वस्त्रीला सोडून कामकंदलेच्या स्वरूपास भुलला! तिच्यासाठीं जो कांहीं दिवस कारागृहांत राहिला, तिच्याच दासीनं ज्याला स्वचातुर्यानं सोडवून नेलं! त्या **माधवाचं** नांव काढतांच बाबांची तळची आग मस्तकास जाईल! तेव्हां माझं मन त्या पुरुषावर बसलं ही मोठी अनुचित गोष्ट झाली! बरं; बाबांच्या आग्रहानं दुसऱ्या पुरुषास माळ घालावी तर **कामकंदलेंत** न् माझ्यांत मग फरक तो कसला? आतां कांहीं होवो! वरणं असेल तर त्या वेश्यानुरक्त **माधवासच** वरीन! **कामकंदलासुद्धां** गुणी असून विचारी आहे! ती न् मी आनंदानं राहून **माधवासह** सुखानं कालक्रमणा करूं. अहहा!

**अंजनीगीत.**

**पाहुनि सुंदर रूप असें हें**
**माझें मन कां त्यास न मोहे?**
**मदनाचें मुळीं सारचि आहे**
**कोमल ती मूर्ती!!!**

मदनानं ते वेळेस माझ्या हातून जें कृत्य करविलें तें मी बाई कधींही विसरणार नाहीं! प्रिया!—

**अंजनी गीत.**

**अनुरागाचा तांबुल देतां! स्वीकारुनि तो हंसतां हंसतां!**
**रोमांचित तनु माझी होतां! गेला कीं निघुनी!!!**



आधीं घरीं जाऊन त्या जिवलगाचं जें मी चित्र काढून ठेवलं आहे

त्याचे वारंवार मुके घेईन ! सवडीनुसार वेळ पाहून **कामकंदलेकडे** जाऊन सगळी हकीकत विचारून घेईन ! व ह्या **रतिप्रियेच्या** घातुक मैत्रिकीवर पाणी सोडून **अवंती** नगरीस अथवा जिथं तो असेल तिथं मी आपल्या जिवलगाचा शोध करण्यासाठीं जाईन ! ( जाते. )

( महालाचा देखावा. **कामसेन** पलंगावर बसला आहे. खुराजवळ अंमळ दूर **रतिप्रिया** उभी आहे. **वसंती** दोघांस वारा घालीत आहे. )

**कामसेन**—( **वसंतीस** ) असा जर माझ्याकडून इकडे येण्यास उशीर झाला असता तर रुसून, रागावून अगदीं थैमान केलें असतें ! परंतु आतां आपल्यासच उशीर झाला ह्मणून कशा चुपचीप दूर जाऊन उभ्या राहिल्यात ! आपल्याकडून अपराध झाला ह्मणजे बरा ! पण दुसऱ्याकडून होतांच पोट दुखायला लागतें !

**रतिप्रिया**—**वसंती** ! कावळा उडायला न् खांदी मोडायला एकच गांठ पडते ती अशी ! माझ्याकडून आजच, सहज अंमळ बागेंत हिंडत होतें ह्मणून इतका उशीर झाला, तों त्याचं इतकं वर्णन ! आजपास्नं मी आपला कान पिळतें जर कधीं आतां उंबऱ्याबाहेर पाऊल टाकीन तर ! झालं खरं ! आपल्याकडून उशीर होतो तो कोणीकडेच गेला ! असो !

**कामसेन**—झालें ! एवढें कांहीं कमी जास्ती बोललों कीं आला राग ! ( मनांत. )

**दिंडी.**

**भोंवयांतें चढवून सुंदरी ही**
**वक्र दृष्टीनें हळुच मला पाही**
**तप्तकांचनसम भासते मला ही**
**जयें माझा संताप लया जाइ !**

( **आपण** उठून तिच्याजवळ जातो. )

श्लोक.

रागें किती भरसि तूं मजलागिं आतां

प्राणप्रिये ! तुजपुढें तव दास येतां !

कां आनना फिरविशीं मुरकून मागें ?

ये ये गडे मजशिं ! दे परिरंभ रागें १ !

हे मानिनी सकल सांप्रत सोड मान !

होई प्रसन्न मजला विसरूनि मौन !

ढाळूं नको विफल तूं नयनाश्रु कांते !

गल्लस्थलांप्रति तुझ्या बहु न्हाणिती ते !

**रतिप्रिया**—( सस्मित ) प्राणनाथ ! त्यांत राग तो कसला ? व इतकी माझी विनवणी ती कशाला ? ( उसासा सोडीत. )अग आई ! !

**कामसेन**—कां ! उसासा सोडलासा !

**रतिप्रिया**—माणसाच्या मनाला एकदां चुरचुर लागली ह्मणजे असले उमाळे फार येतात !

**कामसेन**—पण आधीं बसायचें नाहीं कां ?

( पलंगावर **रतिप्रिया** बसते. )

**कामसेन**—मनुष्याला उमाळे जरी फार आले तरी पण त्याला कांहीं कारण असलें पाहिजे !

**रतिप्रिया**—कारण आहे खरं ! पण तुह्मांला तें सांगितलं तर खरं नाहीं वाटणार !

**कामसेन**—संभवनीय असल्यास कां नाहीं खरं वाटणार? सांगशील तर खरें काय आहे तें ?

**रतिप्रिया**—ठीक आहे ! **कामकंदले**च्या गिरजेनं तसा प्रकार केल्यामुळं तिला जसा सध्यां आनंद झाला आहे; त्याहीपेक्षां जास्त आनंद आपल्या सद्गुणी **चंपकमालतीस** होऊन ती **माधवाच्या** तसबिरीचे मोठ्या प्रेमानं घेघे मुके घेते ! **चंद्रचूडास** लौकर जागें करा ! नाहीं तर त्याच्या हातची ही पोरगी केव्हां निसटून जाईल याचा नेम नाहीं.

आजपासून तिच्या मैत्रिकीवर मी पाणी सोडलं ! मघां तिनं माझ्यापुढं हे वेडेचार करतांच म्यां तिला हातच्या धोरणानं अशी काय पाहून घेतली कीं, ज्याचं नांव तें ! ती न् मी बागेंतच मघां हिंडत होतों ! ती माझ्यावर संतापून जाण्यास व आपल्याकडून मला **वसंती** बोलावूं येण्यास एकच गांठ पडली !

**वसंती**—मी गेलें तेव्हां ह्या दोघीजणी एकमेकांनां हात जोडीत होत्या खऱ्या !

**कामसेन**—चमत्कार आहे ! ही गोष्ट माझ्या ध्यानींमनींही नव्ह-ती ! असो. पण ती तसबीर तूं पाहिलीस काय ?

**रतिप्रिया**—पाहिली ह्मणजे ? तिनंच होऊन ती मला दाखविली. तसबीर मात्र वाखाणण्यासारखी खरी ! नांव ठेवायला पाहूं गेलं तर तिळभरसुद्धां जागा सांपडणार नाहीं ! प्राणनाथ ! **चंपकमालती** हुशार व सद्गुणी आहे ! पण तिनं आपलं मन त्या हलकटाला दिल्या-मुळं मला फार दुःख होत आहे ! याला मी काय करूं ?

**कामसेन**—तिचे हे सगळे बेत जागच्या जागींच राहतील अशी मी **चंद्रचूडा**कडूनच तजवीज करवीन ! मात्र त्या **गिरजेला** मी आतां जिवंत राहूं देणार नाहीं ! तिचें हें कपट मला पूर्वींच समजलें असतें तर आजवर ह्या थरास गोष्टच आली नसती !

**रतिप्रिया**—पण प्राणनाथ ! गडे—राग नका येऊं देऊं माझ्या बोलण्याचा !—तुह्मी इतके शहाणे व दूरवर दृष्टि देणारे असतां तिचं कपट तुमच्यापुढं व **चंद्रचूडा**पुढं चाललं; हें आश्चर्यच ह्मणायचं ! तिनं डाव जिंकला व तुह्मा साऱ्यांच्या हातांवर तुरी देऊन तिनं आपल्या यज-मानिणीची कामगिरी बजावली; ह्मणून तिलाच तुह्मी मारणार ! खासा न्याय ! मी तर आपली वेडीच आहें; पण हें योग्य आहे कां ?

**कामसेन**—( निरुत्तर होतो. )

**रतिप्रिया**—असो मेलं ! ( **वसंतीस** ) तूं आतां घरीं जाशील तर **चंपकमालती**कडे घटकाभर बैस ! तिचा राग रंग पहा न् मग घरीं जा ! सकाळीं मला मग कच्ची हकीकत सांग !

**वसंती**—आज्ञा ( जाते ).

**कामसेन**—प्रिये ! झालेल्या गोष्टीचा वारंवार पाठ वाचला ह्मणजे मनाला तिट्कारा येतो !

**रतिप्रिया**—( स्वगत. ) पण सध्यां माझे मनांत मात्र तुझ्याविषयीं तिरस्कार उत्पन्न झाला आहे !

**कामसेन**—प्रिये ! मी घटकाभर अंग टाकतों ! आज माझ्या मनाला अत्यंत शीण झाला आहे ! याकरितां एक सुंदर गाणें ह्मणून तो शीण नाहींसा कर ! ( पलंगावर लवंडतो. )

**रतिप्रिया**—प्राणनाथ ! मी कोणतं गाणं ह्मणूं ?

**कामसेन**—तुला वाटेल तें म्हण ! तुझा अवाजच फार गोड आहे !

**रतिप्रिया**—ठीक आहे ! ( स्वगत. ) वा माधवा ! तुझें स्वरूप पाहून मी तल्लीन झालें व तुला मनोभावें शरण आलें आहे ! याकरतां ही दासी तुला प्रेमाच्या दोन शब्दांनीं आळवीत आहे तिकडे लक्ष्य दे.

### गाणें.

( चाल—द्रौपदीचे मंदिरीं राजा कर्ण.)

**प्रियकरनाथा ! प्राणेशा ! अंबुजनयना !**
**तुम्हां माझी; येऊंद्या कांहीं करुणा !**
**येउनि द्या–हो; मजलागीं त्वद्दर्शना !**
**तेणें–माझे–निवतील; नेत्र जाणा ! १**

**मोहें तुम्हा; वश अंतर माझें झालें !**
**टोंचूं लागे; मन्मथ तो मजला भाले !**
**विरहाग्नीनें–दग्ध हें अंग केलें !**
**कितिहो !–बघतां–मन शोधुनि माझें मेलें ! २**

**रात्र जातां निर्दय तो हल्कट बाई !**
**कंठीं माझ्या माराया मिठि आगाई !**
**होईल तेव्हां–उद्युक्त करुनी घाई !**
**टाळाया ती मज युक्ती कांहीं नाहीं ! ! ३**

**येउन आतां मज जाल जर घेऊन**
**तुमच्यावरुनी ओंवाळिन अपुला प्राण**

नाहींतर मी—उरिं ही सुरि खोंचून
तुम्हांसाठीं—देइन मी सखया ! प्राण !!! ४.

**कामसेन**—( उठून ) प्रिये ! किती हा तुझा गळा गोड ह्मणून सांगू ? माझे सारे श्रम लयास गेले ! तथापि ही कोणत्या ज्यारिणीची उक्ति आहे बरें ?

**रतिप्रिया**—प्राणनाथ ! ती ज्यारिणी नव्हे ! महा पतिव्रता आहे ! ( स्वगत. ) आई ग ! माझं कपाळ दुखूं लागलं !

**कामसेन**—पतिव्रता ?

**रतिप्रिया**—हो ! तर ?

**कामसेन**—ह्मणजे ?

**रतिप्रिया**—गिरजेनं तुमच्या हातावर तुरी देऊन तिनं जें **माधवांस** सोडविलं तें उगीच नाहीं ! वास्तविक ह्मटलं तर आह्मां अडाणी बायकांपेक्षां तुम्हांला जास्त माहिती असावी !

**कामसेन**—आह्मी आपले **मूर्ख** ! मग तर झालेंना ? पण त्या पतिव्रतेचें नांव तर सांग !

**रतिप्रिया**—**शिशुपाळा**बरोबर आपलं लग्न उद्यां सकाळीं लागणार असं **रुक्मिणी**ला समजतांच तिची कंबर खचली ! जीव कासावीस होऊं लागला ! ती माशासारखी तरफडूं लागली ! काळीज धडधडां उडूं लागलं ! **कृष्णा**च्या चरणीं तिची एकसारखी तंद्री लागली ! शेवटीं ती पलंगावर पडली ! तरी तिला झोंप ह्मणून कांहीं केल्या येईना ! तेव्हां तीनं सद्गदीत होऊन **कृष्णा**ची प्रार्थना केली ! तिच्यावर, तुह्मास म्हणून दाखविण्याकरितां मी हें चिमुकलं गाणं रचलं आहे ! प्राणनाथ ! चांगलं साधलं कांहो हें?

**कामसेन**—चांगलें म्हणून किती सांगू ? चाल तरी किती गोड ! माझी तर वृत्ति केवळ तदाकार बनून—प्रिये !—टोंचूं लागे मन्मथ तों मजला भाले ! ! !

**रतिप्रिया**—( स्वगत. ) आतां आपण आपलं दूर व्हावं हें बरं ! ( तसें करते. ) हंस खाईल तर मोतींच खाईल ! ( उघड. ) माझ्या

अंगाचा आज दाह फार होतो ! हुश्श् ! ( पदरानें वारा घेते. )

**कामसेन**—( तिच्याजवळ जाऊन. )

**श्लोक.**

**मानीनीप्रति मानहीन करुनी कांताकडे लाविते !**
**भेदी स्त्री हृदयास जी प्रियसखे ! झाली निशा साच ते !**
**मारूनी मुरका हळूंच सरशी मागें कशाला तरी ?**
**गाढालिंगन देउनी मजशिं तूं आनंदवी अंतरीं ! १**

**रतिप्रिया**—( स्वगत. ) मना ! कर तूं आपला निश्चय कायमचा आतां ! ( **कामसेनास** झिडकारून दूर होते.) ( उघड ) माझ्या अंगाला आज हात नका लावूं ! मघापासनं एकसारखं माझं कपाळ उठलं आहे ! व अंगाची तर काही काही होत आहे ! हाय ! हाय !

**'प्रियकर नाथा ! प्राणेशा ! अंबुजनयना !**
**तुह्मां माझी येऊं द्या ! कांहीं करुणा !'**

( निघून जाते. )

**कामसेन**—( खिन्न मुद्रेनें आपणाशीं. ) ह्याचा काय बरें अर्थ ? माझ्या हातून तिचा असा अपराध तरी काय झाला ? मघाचें तिचें तें स्मित करून माझ्याजवळ लडिवाळपणें बसणें व तें मंजुळ गाणें म्हणणें आणि आतांचें हें तिचें दाण्कन् पाय आपटून मला झिडकारून जाणें; ह्यानें मीं काय बरें समजावें ?

**श्लोक.**

**कां रागें मज भरशी प्रिये ! अशी तूं !**
**आला कां तुज भलता मनांत किंतू ?**
**जाशी कां तरि अवमानुनी प्रिया या ?**
**हा आलों मनधरणी तुझी कराया !**

( जातो. )

पडदा पडतो.

## प्रवेश ५ वा.

### स्थल—वरुणावती नदीचें तीर.

### पात्रें

**चंपकमालती**..............................चंद्रचुडाची कन्या.
**कामकंदला**..............................वेश्या ( नायिका.)
**गिरजा**..............................तिची प्रियदासी.

**चंपकमालती**—कामकंदले ! तुह्मी बोलतां बोलतां माझ्या बरोबर बऱ्याच लांब आलांत ! हें पहा ! आपण वरुणावतीवरसुद्धां आलों ! पहाटची चहूंकडे सामसूम असल्यामुळं हिचं खळखळणं कसं स्पष्ट ऐकूं येत आहे ! असो. पण तुह्मी आतां कोठपर्यंत मजबरोबर याल ?

**कामकंदला**—( गहिंवरून. ) जातों; आतां आह्मी परतच जातों ! पण आपण रस्त्यानं जपून जा बरं ! एकट्या आहांत ह्मणून ह्मणतें !

**चंपकमालती**—त्याविषयीं तूं कांहीं एक काळजी करूं नको ! पण **कामकंदले** !—ऐकलंस कां **गिरजे** !—ह्मटलं म्यां वारंवार तेंच तेंच पुन्हां तुह्मांला सांगावं असं नाहीं ! तथापि जोंपर्यंत आपणांस दैव प्रातिकूळ आहे, तोंपर्यंत, माझ्या मातापितरांनीं कंठशोष करून प्राण जरी सोडला, तरी बेहत्तर आहे ! पण माझ्या प्रयाणाविषयीं कानाचा कोनसुद्धां कोणाला कळवूं नका ! येवढीच माझी तुह्मांला आतां प्रार्थना आहे !

**गिरजा**—( स्वगत. ) प्रेमाच्या ओढ्यानं भित्र्या बायकांनासुद्धां स्वतःच मार्गक्रमण करण्याचं धैर्य येतं तें असं ! ( उघड ) बाईसाहेब ! वसंती जरी माझी बहीण आहे तरी मीं तुमच्याविषयीं तिच्याशीं अवाक्षरसुद्धां काढायची नाहीं !

**चंपकमालती**—असो, ईश्वर माझा पाठिराखा आहेच! **कामकंदले**, तूं आतां माझी प्रेमाची बहीण झालीस ! ह्मणून आपण एकमेकी सुखदुःखाच्या वांटेकरी सारख्याच आहोंत ! ईश्वरानं माझ्या यत्नांस यश दिलं तर तुला ताबडतोब बोलावून घेईन !

**कामकंदला**—देव करो न् तुमच्या तोंडांत साखर पडो !

**चंपकमालती**—गिरजे !

### दिंडी.

असे शिप्रा नदि थोर ज्या पुरीला
जिथें स्वप्रियकर निघुनि बाइ ! गेला !
भूप विक्रम वाहतो भार जीचा
सांग मजला त्या मार्ग उज्जनीचा !

**गिरजा**—पण मघां—

**चंपकमालती**—तूं सांगितलास खरा ! पण तेव्हां माझं मन रतिप्रियेच्या भांडणांत गेल्यामुळं तुझ्या त्या सांगण्याकडं हवं तसं लक्ष्य नव्हतं ! सखे !

### अंजनीगीत.

तव वचनामृत घटघट प्यायाा । सादर केलें कर्णांप्रति या ॥
इच्छा त्यांची तृप्त कराया । तत्पर तूं होई ! ॥

**कामकंदला**—गिरजे ! मघां बाईसारखीच माझी अवस्था होती ! ह्मणून मलाही तें ऐकावसं वाटतं !

**गिरजा**—ठीक आहे !

### साक्या.

चपळ नागिणीसमान जींची चंचल गति हो ! आहे
जागोजागीं पाषाणांतें फोडुनियां जी वाहे ! १
औषधिपतिच्या किरणें चमके रौप्यासम जल जीचें
पहिल्यानें त्या दर्शन घ्यावें वरुणावति सरितेचें ! २
तर्जनिनें जल उडवुनि घ्यावें अंगावर भावानें
ओलांडुनि ही सरिता जावें उज्जनिच्या मार्गानें ! ३
दोन योजनें जागा आहे पुढें बहुत रमणीय
अवलोकोनी सृष्टीरचना गार गार मन होय ! ४
अंगसुवासें लाजुनि तुमच्या कस्तुरिमृग चित्तांत
दृष्टिस पडतिल इकडुनि तिकडे पळतांना रानांत ! ५

नानाविध ते विहंग पडतिल तुमच्या दृष्टिस रानीं
करतांना रव कलकल मार्गीं वृक्षांवर बैसोनी ! ६
आजवरी पायानें चालत तुम्ही गेलां नाहीं
म्हणुनि सांगतें थकवा येइल तुह्मांला लवलाहीं ! ७
एका आम्रतरूच्या खालीं घ्या थोडी विश्रांती
मार्गक्रमणा पुनरपि लागा प्रार्थुनि ईश्वर चित्तीं ! ८
देवदयेनें तास तुम्हांला वनिं डावा जाईल
लवकरिं तेणें सुफलित हेतू तुमचे ते होतील ! ९
यापरि जातां हळुंहळुं तुम्ही चारपांच दिवसांनीं
माळवंटिचा प्रांत अहा ! तो अवलोका नेत्रांनीं ! १०
वृक्षश्रेणी नाहीं तेथें, मग कुठली ती छाया !
सरिता नाहीं मग आणावें कोठुनियां जल प्याया ! ११
खालीं रेती वरतीं रविचीं किरणें तीव्र अहा ! तीं
पांथस्थांच्या फोड पदांला तरतरुनी बहु येती ! १२

चंपकमालती—( भिऊन. ) आग बाई ! तिथं म्यां कसं चालावं मग ?

कामकंदला—आणखी त्यांतून तुह्मांला अजून ऊन कसं तें मुळींच ठाऊक नाहीं !

गिरजा—अहो ऐका तर पुढं !

साक्या.

चार कोस ती जागा आहे परि करिते बहु खात्री !
याकरितां तुम्हि धैर्य धरोनी क्रमा मार्ग तो रात्रीं ! १३
पुढें टेंकडी सुंदर आहे नदि ही खळखळ वाहे
देवसरोवर तेथें दुसरें मानसपरिचें आहे ! १४
तत्तटिं किंचित् काल बसोनी उपहारा सारोनी
तेथुनि अटवी थोर बघा ती दृष्टी लांब करोनी ! १५
पर्जन्याच्या धारा असती दाट जशा अगणीत
वृक्षश्रेणी तशा असति त्या भयदायक अटवींत ! १६
नानाविध पशु मार्गामाजीं आड तुम्हां येतील

अपराधाविण परि कोणाला दुःख न ते देतील ! १७
म्हणुनि सांगतें मनिं भीण्याचें कारण अगदीं नाहीं
पार करावी होइल तैशी अटवी ती लवलाही ! १८
पुढें चार योजनें असे मग उज्जायिनी नगरी ती
शिप्रानदिच्या असे तटीं जणु हंसीवर सावित्री ! १९
तिथें जाउनी शोधा तुमचा प्रियकर तो ‘ रंगेला’
भिल्लिण जैशी शोधित होती नाथ महादेवाला ! २०

चंपकमालती—गिरजे ! तरी तूं आपली जातां जातां माझी थट्टा केलीसच ! असो. कामकंदले, देतेस ना मला निरोप ! जास्त वेळ नाहीं ! कारण—

दिंडी.

चंद्र पांडुर हा होत चालला गे !
थंड मारुतही मंद वाहुं लागे !
पहा ! मावळल्या चांदण्या प्रभूत !
अतां सत्वर होईल सुप्रभात !

कामकंदला—(गहिंवरून चंपकमालतीस कडकडून भेटते.) बाई!

अंजनीगीत.

अरविंदासम कोमल ज्यांची। सुंदर तनु हो ! आहे साची !
शोधुनि मूर्ती ती नाथांची। लवकर या येथें ! ॥

चंपकमालती—ईश्वर काय करील तें खरं ! बायांनो ! रतिप्रिये-विषयीं मीं तुम्हांला सारं सांगितलंच आहे ! (साश्रु.) येतें आतां !

कामकंदला व गिरजा—या—

(जातात.)

अंक २ रा समाप्त.

---

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

स्थल—अरण्य.

पात्रें.

**माधव**..........................द्विजपुत्र ( नायक )
**विक्रम**..........................उज्जनीचा राजा.
**विदुषक**.................... ....त्याचा मित्र.

( **विक्रम** व **विदूषक** प्रवेश करतात. )

**विक्रम**—मित्रा ! आजच्यासारखा शिकारीनें मला कधींही शीण आला नव्हता ! फक्त हें हरण आणि तो वाघ ! हीच काय ती आजची शिकार ! त्या सिंहाचा आपण पाठलाग केला नसता तर आपण केव्हांच उज्जनीस पोंचलों असतों ! पण आतां काय ! हा पहा सूर्य क्षितिजाखालीं गेला ! पश्चिम-दिग्प्रांत आरक्त दिसूं लागला ! वारा बंद झाल्यामुळें एकाही झाडाचें पान हालत नाहीं ! पक्षीही आपल्या घरव्यांत जाऊन स्वस्थ पडले ! ( वर पहात. ) ह्या पहा ! चांदण्यासुद्धां भराभर वर येत चालल्या ! आतां लौकरच काळोख पडणार म्हणायचा ! घरीं जाण्याचें मनावर धरलें तर वाटेंत ठेंचा खाण्याचें तुला पत्करावें लागेल ! मग कसें काय ?

**विदूषक**—बाबारे ! त्या ठेंचा पत्करल्या ! पण घारीसारखी जी लठ्ठ ! घुबडासारखे जिचे डोळे ! माकडासारखें जिचें तोंड ! कुंभाराच्या घोड्यासारखे जिचे कान ! नक्टीसारखें जिचें नाक ! उंटासारखी जिची मान ! म्हशीसारखी जिची पाठ ! फणसासारखे जिचे स्तन ! हांड्यासारखे जिचे नितंब ! हत्तीसारख्या जिच्या मांड्या ! अस्वलीसारखे जिचे पाय ! व अजगरासारखे जिचे हात ! त्या आमच्या भुवनसुंदरीची, 'रात्रीं कां आला नाहीं ?' म्हणून उठतां लाथ व बसतां बुक्की नको बा ! या उपर तुझी हुक्की !

विक्रम—( हंसत ) वः! धन्य तुझी भुवनसुंदरी ! व धन्य तूं! ! तिचें स्वरूप मात्र तूं ठाम वर्णन केलेंस !

विदूषक—ठाम ह्मणजे? कविच आहें मी ! !

विक्रम—कांहो कवि ? पण तुम्हाला ती आवडते का ?

विदूषक—आवडते ह्मणजे ?

श्लोक. ( पूर्वार्ध. )

**हल्याला जशी आवडे म्हैस थोर !**
**तशी ती मला आवडे नार फार !!**

शिवाय 'स्वस्त्रीचेठायीं प्रीति असणें ; हें थोराचें लक्षण मानतात.!'

विक्रम—येवढें मात्र खरें ! व तूंही थोर खरा !

विदूषक—पण मित्रा ! त्यांत एक मात्र वाईट आहे !

श्लोक ( उत्तरार्ध. )

**जधीं मी तिचें काम नाहीं करीत**
**तधीं देतसे ती मम श्रीमुखांत ! ! !**

विक्रम—वः! मग तर फार चांगलें ! असो. मित्रा ! तुझा विनोद आतां पुरे ! बोलांयच्या नादांत चांगलाच काळोख पडला ! आतां एक काम कर ! पुढें जा. व छानदार बसण्याजोगी एखाद्या झाडाखालीं जागा पहा ! ह्मणजे तेथें जाऊन आपण थोडासा उपहार करून मग घरीं जाऊं !

विदूषक—उपहाराचें तूं नांव घेतलेंस ह्मणून मला जाणें भाग आहे ! बाकी उंटावरून शेळ्या वळायला कांहीं माझ्या गुरूनें मला शिकविलें नाहीं ! ( उसासा टाकीत ) चलाब्वा ! अष्टवक्रराव! दुर्लभं भारते जन्म भोजनं तत्र दुर्लभम् !

( पडद्यांत )

श्लोक.

**किति तरि असे मी पाषाण ! प्रियेस न भेटुनी**
**समजुत तिची मी कांहींही गृहांत न घालुनी !**
**विनवणि तिची म्यां दुष्टानें अहा ! झिडकारुनी**
**दुखवुनि तिच्या चित्ता आतां शिणूं किति मी मनीं ॥ १ ॥**

**विक्रम**—( आश्चर्यानें. ) श्रीशंकरप्रसादानें माझ्या राज्यांत को-णालाही दारिद्र्य किंवा दुःख नसतां येथें कोण बरें रूदन करीत आहे ? मित्रा ! चल मजबरोबर ? कोण आहे तें आपण पाहूं.

**विदूषक**—( तिरस्कारानें) अँः ? दुष्काळांत तेरावा महिना तो हा ! ( उठून **विक्रम व विदूषक** चालल्यासारखें करतात ).

**माधव**— ( येऊन, आपणांशीं दुःखानें ) हाय! हाय! प्रिये!

**श्लोक.**

**सजल नयनें माझ्या कंठीं तुवां कर घालुनी**
**इलुंच म्हटलें " नाथा ! जाऊं नका मज टाकुनी ! "**
**अहह ! परि गे ! म्यां चांडाळें तुला अवमानुनी**
**त्वरित निघुनी आलों येथें रडूं किति मी वनीं?**

कायहो? ह्या अवनींत माझें दुःख हलकें करणारा कोणीच नाहीं काय?

**विक्रम**—( पुढें होऊन हात जोडून. ) महाराज! हा दास आपलें दुःख हलकें करण्यास झटण्यासाठीं एका पायावर उभा आहे! ब्राह्मणो ममदैवतं!

**माधव**—( चपापून आपणाशीं. ) अरे, हा तर दुःखितांचें दुःख हरण करणारा व वचनासाठीं प्राण देणारा अवंतीचा नाथ **विक्रमच** माझ्यापुढें उभा आहे! ह्या कल्पतरूपासून मीं आपले मनोरथ कां न पूर्ण-करून घ्यावे? ( उघड ) राजा ! ईश्वर तुझें कल्याण करो! तुझ्या या मं-जुल वाणीनेंच माझें दुःख हलकें झालें!

**विक्रम**—छिः! छिः! महाराज! माझ्यापासून असें लपवूं नका! दुः-खितांचें दुःख हरण करण्यांतच हा देह झिजावा अशी माझी उत्कटेच्छा आहे! असो. पण पहिल्यानें आपलें नामाभिधान कळेल तर आपल्या दा-सावर आपला अनुग्रह झाल्यासारखा होईल!

**माधव**—( स्वगत. ) ताकाला येऊन आतां भांडें लपविण्यांत काय अर्थ आहे? ( उघड. ) राजा, माझें नांव **माधव!** माझ्या विधिविपर्य-यानें सांप्रत मला अत्यंत दुःख होत आहे. त्याला तूं काय करशील?

**विक्रम**—तें खरें आहे! तथापि ह्या जगांत जर मनुष्याला प्रयत्न साह्य नसता तर आपलें ह्मणणें मात्र मला मग मानवीशक्तीबाहेर आहे

असें ह्मणून स्वस्थ बसावें लागतें ! त्यांतून दुसऱ्यास दुःखी पाहिलें तर त्याहून मला जास्त दुःख होतें ! ह्याकरितां कृपाकरून आपलें हृद्गत काय आहे तें कळूंद्या ! दैव दुर्विलासानें आपणांस दारिद्र्य येऊन जर आपणांस आपल्या प्रियस्त्रीचा वियोग घडून देशाटन करावें लागत असेल तर मजजवळून लागेल तितकें द्रव्य घ्या ! घरीं जा ! व आपल्या स्त्रीसह आनंदानें कालक्रमणा करा ! पण माझ्यासमोर असे आपण दुःखानें दीन होऊं नका !

**माधव**—राजा विक्रमा! तूं ह्मणतोस अशाच कांहीं प्रकारच्या दुःखानें मी गांजलों आहें! तथापि तुला तें सांगून काय उपयोग? तुझ्या हांतून त्याचा परिहार होईल कीं नाहीं याचा मला बळकट संशय आहे! ह्मणून मी ह्मणतों कीं माझ्या नादीं तूं लागूं नकोस! कारण तूं ह्मणतोस त्या दुःखांत व मी भोगीत आहें ह्या दुःखांत जमिनअस्मानाचा फरक आहे. तुझी मर्जी असल्यास मी आपल्या दुःखाचा पाढा पाहिजे तर वाचतों तुझ्यापुढें! पण त्याप्रमाणें तुझें दुःख समूळ नाहींसें होईल असें मला तुझें वचन पाहिजे.

**विक्रम**—अं:! इतकेंच ना? हें घ्या वचन!

( त्यास वचन देतो. )

**माधव**—( गहिंवरून. )

**श्लोक.**

आहे सुंदरि एक देवनगरींमाजीं रतीसारखी !
मच्चित्ताप्रति तीं हरून बसली होऊन भारी सुखी !
दुःखी मीं हृदयांत फारच असे बा! तद्वियोगें परी
मच्चित्तासह आणुनी गजगती तीं दे मला सत्वरीं ! ॥१॥

परंतु ह्याकरितां तुला कामसेनाचा नाश केला पाहिजे! कारण त्यानें तिला पिंजऱ्यांतल्या मैनसारखी ठेवली आहे!

**विक्रम**—वचन दिल्यावर त्याचा आतां विचार काय उपयोगी? ज्याअर्थीं मी आपल्या वचनानें बांधला गेलों आहें त्याअर्थीं योग्य वाटल्यास मी त्याचा समाचार घेण्यास ह्मणजे मागेंपुढें पाहीन असें मुळींच नाहीं! पण प्रथमतः मला ह्मटलें होतें कीं ती आपली विवाहिता असेल!

**माधव**—आणि आहे ह्मटल्यास फारशी हरकत नाहीं !

**विक्रम**—मग ती **कामसेनाची** कन्या किंवा अशापैकीं आहे काय?

**माधव**—तसेंहि नाहीं!

**विक्रम**—तर मग?

**माधव**—( त्याच्या कानांत कांहींसें सांगतो. )

**विक्रम**—( आश्चर्यानें ) कोण ती **कामकंदला**?

**माधव**—होय राजा!

**विक्रम**—**माधवराज**! आपणासारख्यांस असल्या गोष्टी शोभत नाहींत! त्यांतूनही परस्त्रीचे—तशांतून **कामकंदले**सारख्या हलकट वेश्येचे—नादीं लागून आपलें कधींहि कल्याण होणार नाहीं! ह्यासाठीं माझें ऐका. व तिचा नाद सोडून द्या. ह्यांत आपलेच माझ्यावर महदुपकार होतील! मी आपणांस जास्त सांगावें असें नाहीं! आपण बहुश्रुत व ज्ञानीच आहां! आपण तिच्यावर फिदा झालां हें खरें! व त्याप्रमाणें तीहि तुमच्यावर फिदा झाली असेल हेंही खरें! तथापि ह्यापासून केवढें नुकसान होणार आहे व **कामसेन**राजा आपल्या जिवास कसा मुकणार आहे हें मींच आपल्यास सांगावें असें नाहीं!

**माधव**—**विक्रमा**! तूं असें बोलशील हें माझ्या मनांत आधींच येऊन चुकलें होतें! पण आतां त्या तुझ्या बोलण्याचा व अरण्यांत रुदन करण्याचा सारखाच उपयोग आहे ! कारण त्वां मला वचन दिलें आहेस ! माझें **कामकंदले**वर मन बसलें आहे ह्मणून मी तिची स्तुती करतों असें मात्र तूं समजूं नकोस ! वास्तविक म्हणशील तर—

### श्लोक.

**वेश्येच्या उदरीं जरी विधिबळें तज्जन्म झाला असे**
**नाहीं ती गणिका तरी स्वकृतिनें; ती भोग्य सर्वां नसे**
**ती बाह्यांतरिं सारखी मृदु असे लज्जावती मानिनी**
**सौजन्यें करुनी कुलीन वनिता ती लाजवीते मनीं ! ॥१॥**

वेश्येच्या नादीं लागल्यापासून आजपर्यंत झालेले भयंकर परिणाम म्यां पुष्कळ ऐकिले आहेत. व कांहीं तर प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेही

आहेत! परंतु त्या प्रत्येक भयंकर परिणामाच्या मूळाकडे विचारपूर्वक लक्ष्य देऊन पाहिलें तों तिच्या लोभीपणाखेरीज, त्याच्या उल्लूपणाखेरीज व दुसऱ्याच्या कुसंगतीखेरीज दुसरें कांहीं एक मला आढळलें नाहीं! पण राजा! मजकडे पाहतां माझ्यांत तशापैकीं एकही प्रकार सांपडणार नाहीं! मी तिला जितका वश झालों तितकीच तीही मला वश झाली आहे! माझें आणि लक्ष्मीचें कितपत सूत आहे; हें तिला पूर्णपणें ठाऊक आहे! असें असूनही ज्या अर्थीं ती मजवर अनुरक्त झाली; त्या अर्थीं ती लोभी नाहीं हें सिद्ध झालें! शिवाय तिच्या त्या थोर अंतःकरणावर बापडा लोभ तो कितपतसा पगडा बसविणार? तेव्हां त्याची कल्पनाही नको. तुझ्यासारख्या सज्जनांची मला संगत असल्यावर मी कुमार्गगामी होईन ही गोष्ट कालांतरींही घडणें नाहीं! सारांश तिच्या नादीं लागल्यापासून माझें अकल्याण होईल हा तुला निवळ भ्रम आहे!! याही उपर जर तुझ्या मनांतच नसलें तर माझाही तुला विशेष आग्रह नाहीं! तूं माझ्या अगदींच गळीं पडलास ह्मणून म्यां तुला सारें सांगितलें! असो. नाहीं तर नाहीं! (साश्रु.) ह्या जन्मीं आह्मीं उभयतां एकमेकांच्या विरहानलानें भाजून भाजून मरूं. व पुढल्या जन्मीं तरी, ह्या दृढतम प्रेमाशातंतूनें, एकमेकांस वरून सुखानें नांदूंच नांदूं! राजा! जा तूं आतां! रात्र फार झाली आहे. व माझ्यासाठीं तुला श्रमही फार झाले आहेत, ईश्वर करो आणि तुझें राज्यवैभव शुक्लेंदुसमान दिवसेंदिवस वाढतच जावो! हाय! हाय! हे अंतका! आह्मां उभयतांचें आयुष्य कमी करून तूं आह्मां उभयतांचा लौकर अंत कर. व तें आयुष्य ब्रह्मदेवानें आह्माला दुसरा जन्म दिला ह्मणजे त्यांत भरती घाल. ह्मणजे तितकाच वेळ आह्मांला त्या जन्मीं सुखाचा अनुभव जास्त घेतां येईल. हाय! हाय! **कामकंदले**! आज सर्व कांहीं खुंटलें! माझा आशातरु आतां उन्मळून पडणारच ह्मणायचा—(मोह पावतो)

**विक्रम**—(कळवळून) खरोखर! ह्या ब्राह्मणाची प्रीति त्या **कामकंदले**च्या ठिकाणीं कांहीं विलक्षण दिसते! वचन दिलें आहे त्याअर्थीं ह्याची मनिषा पूर्ण करण्यास मला झटलेंच पाहिजे.

**विदूषक**—( संतापून ) मित्रा ! चलरे लौकर ! मघांपासून माझे प्राण क्षुधेनें व्याकूळ झाले आहेत !

**विक्रम**—मित्रा ! इतका रागावूं नकोस ! चल आतां ! या ब्राह्मणाला आपण घेऊन जाऊं.

**विदूषक**—( कानांवर हात ठेवून ) आमच्या कानीं सात बाळ्या व बहिरोबाला आरोळ्या ! बाबारे ! ब्राह्मण हें तुझें दैवत आहे, तें तुझें तुलाच लखलाभ असो, माझें दैवत आपलें गणपतीचे मोदक ! घरीं जाईन; खूप खाईन! पाणी पिईन व तट्ट फुगलेल्या बोक्यासारखा स्वस्थ निजेन! हा त्या चांदणीसारख्या पोरीला भाळला आहे खरा! पण पुढें जेव्हां आमच्यासारखी ह्या राजश्रीची फजिती उडत जाईल तेव्हां समजेल सारें सख ! ( वर पाहून ) मित्रा हा पहा पुष्ट रेड्यासारखा दाट अंधार पडला आहे ! चल लौकर ब्वा आतां !

**विक्रम**—ह्या ब्राह्मणाला जरा सावध होऊंदे.

**विदूषक**—चल आपण ह्याला त्या झाडाखालीं घेऊन जाऊं ! तेथें जवळच एक झरा आहे; त्यांतलें पाणी ह्याच्या डोळ्याला लावूं व घटकाभर वारा घालीत बसूं! म्हणजे हा होईल सावध !

**विक्रम**—ठीक आहे, चल तर !

( जातात. )

---

## प्रवेश २ रा.

स्थल—अरण्य.

पात्रें.

शृंगारवल्लरी........................माधवाची विवाहित स्त्री.
चंपकमालती........................माधवावर अनुरक्त झालेली.
एक राक्षस........................पूर्वजन्मीचा एक मदांध ऋषि.

( शृंगारवल्लरी येते. )

**शृंगारवल्लरी**—परमेश्वरा, घरचे घरीं मामंजीच्या जीवावर सुखानें

तुकडा खाऊन होतें ! कोणत्याही गोष्टीनं त्यांनीं किंवा सासुबाईनीं मला दुखावलं नाहीं ! मी आज प्राणनाथांच्या वियोगानं पुष्कळ दिवस झुरत आहें! तथापि सासुसासऱ्यांच्या सत्संगतीनं व त्यांनीं मला 'पुढल्या काळाकडं लक्ष्य दे!, ह्मणून मोठ्या गोड शब्दांनीं उपदेश वारंवार केल्यामुळं आजपर्यंत मी मोठ्या कष्टानं व धैर्यानं काळ लोटला ! हाय ! हाय ! माझा मुलगा आज येईल, उद्यां येईल! पुढं आह्मी सुखी होऊन सारेजण आनंदानं काळक्रमणा करूं, अशा विवंचनेंत देवानं त्या उभयतांचा अंत करून मला अनाथ केलं ! देवा ! मी आतां कायरे करूं ? आईबापानींहि मला लहानपणींच सोडल्यामुळं मला आतां माहेर अंतरलं! तरी मी तें दुःख गिळून सासुबाईंना व मामंजींनाच त्यांच्या ठिकाणीं समजून काळक्रमणा करीत होतें ! आज त्यानींहि मला सोडलं ! ! प्राणपतींनां तर प्रवासास जाऊन पुष्कळ दिवस झाले. दुर्दैवानं अजूनही मला त्यांचा सुगावा कांहींच लागला नाहीं. व त्यांनींहि इतकी माझी मेली राहिली पण—आपल्या प्रिय मातापितरांची आठवण धरून एखाद्याबरोबर तरी बोटभर चिठ्ठी अथवा खुशालीचा तोंडजबानी मजकूर कळवायचा होता ! तोही नाहीं। कोणीकडं ते झुकले असतील ते असोत ! तेव्हां मला कोणाचा आधार राहिला ? व कोणत्या आशेवर म्यां घरांत बसून दिवस काढावे ? बरं घरीं राहिलें तर सूर्य माध्यान्हीं आल्यावर पोटाची भरती तरी कशी करावी ? लोकांकडं मोलमजुरी करून दिवस काढावेत तर तिकडूनही पंचाईत ! मेल्या कर्जदारांच्या धाकानं मला काळं तोंड करून इथं असं भटक्या मारीत यावं लागलं ! आतां मी काय करूं ? कोणीकडं जाऊं ? कोणत्या दिशेला माझे प्राणनाथ असतील ?

दिंडी-

प्रिया! मजला टाकून कुठें गेला ?<br>
कुठें शोधाया जाउं आपणाला ?<br>
किती कंठावे दिवस वियोगांत<br>
झुरुनि झुरुनी म्यां आपल्या मनांत ?

( इकडे तिकडे हिंडते व वृक्षांस अनुलक्षून ) हे आम्रकदंबादा तरूंनो ! वो हे त्यांच्या प्रियकर साहकारींनो ! माझा प्राणनाथ कुठं

गेला हें तुम्ही कृपा करून मला सांगाल काय ? हाय ! हाय ! तुम्ही तर आपल्या शाखारूप हस्तसंकेतानं नाहीं ह्मणून ह्मणतां ! बाबानों ! तुह्मांला ईश्वरानं तुमच्या प्रियांसह एकेच ठिकाणीं ठेवलं ह्मणून तुम्ही सारे परदु:खशितल आहां ! ईश्वर करो व तुह्माला परस्परांचा वियोग कधींहि न घडो ! तर बाई ! आतां मी पुसावं तरी कोणाला ? व आंव तरी कुणीकडं ? हे अश्वत्था ! हे औदुंबरा ! तुम्ही तरी माझ्या जिवलगाविषयीं कांहीं बातमी सांगाल काय ? पण काय मी वेडी ! ज्यांना जन्मापासून स्त्री ह्मणजे काय व प्रेम ह्मणजे काय हें मुळींच माहित नाहीं, त्यांनां माझ्या या प्रश्नाचं उत्तर कसं देतां येईल ? शिव ! शिव ! दुर्दैवानं इथं कोणी पशूही माझे दृष्टीस पडत नाहीं ! नाहीं तर त्याला तरी मी आपल्या प्राणनाथांविषयीं कांहीं विचारलं असतं ! किती हें ओसाड व भयंकर अरण्य तरी ! खालीं जमीन, वर आकाश व मधीं मोठमोठालीं झाडं ह्यांखेरीज चौथं कांहींच नाहीं. नाहीं ह्मणायला ही हतदैवां मात्र आपल्या प्रियासाठीं इकडून तिकडं व तिकडून इकडं व्यर्थ भटक्या मारीत फिरत आहे. देवा ! अजूनही माझी तुला करुणा येत नाहीं कां ? आईग !–( खालें लवून पायांतला कांटा काढते. )

श्लोक.

पायांस कंटक असे रुतुनी प्रभूत
देहास कष्ट पडुनी बहु ह्या जगांत !
भेटाल नाथ मजला जर साच त्यांत
होईल सौख्य तर हो ! बहु मन्मनांत !

**चंपकमालती**—( येऊन आपणांशीं ) ह्या स्त्रीला पाहून माझ्या मनांत हिच्याविषयीं प्रेम कां बरं उत्पन्न झालं ? तेंव्हां देवाच्या मनांतून हिचं न् माझं कांहीं नातं जोडवायचं आहे असं दिसतं ! मघांपासून मी ह्या झाडाच्या आडून हिचं जें भाषण ऐकलं त्यावरून ज्या महाभागावर मी अनुरक्त झालें त्या **माधवा**चीच ही स्त्री असावी ! असं वाटतं ! असो. ओघाओघानं सर्व गोष्टी बाहेर येतीलच ! ह्मणून आपण होऊनच हिच्याशीं भाषण करावं ! ही एक बरी देवानं मला सोबत दिली ! हिच्या सारखेच मी क्लेश भोगीत आज पुष्कळ दिवस वनांतून भटक्या मारीत

फिरत आहे! त्याच सुंदर पुरुषाची ही स्त्री असली व हिला जर माझ्या कडून हिच्या प्रिय पतीची वार्ता कळली तर,मला माझ्या सवतीचा लाभ झाला ह्मणून व हिला हिच्या श्रमाचं सार्थक होण्याची वेळ जवळ आली म्हणून; आह्मां उभयतांस किती बरं आनंद होईल? ती पहा हळुहळु इकडंच येत आहे तेव्हां आपण आतां तिच्या दृष्टीस पडावं हें बरं! (तसें करते)

**शृंगारवल्लरी**—( तिला पाहून ) हे वनदेवते! मजवर तूं तरी आतां एवढी कृपा कर!

### दिंडी.

**भव्य सुंदर रमणीय मूर्ति ज्याची**
**होय दुसरी प्रतिमाच अनंगाची!**
**सांग माझ्या त्या नाथ माधवाची**
**असे वार्ता कां ज्ञात तुला साची?**

**चंपकमालती**—( आनंदानें स्वगत ) आतां तर माझा मुळींच संशय फिटला. ( उघड ) माझे सखे मला एकदां तुला कडकडून भेटूं दे! ( तसें करते. )

### श्लोक.

**माझा तुझा सुंदर तोच कांत**
**आहे सखे! सांप्रत उज्जनींत!**
**जाऊं तिथें बोलत गोड गोष्टी**
**आतां नको अंतरिं होउं कष्टी! ॥ १ ॥**

**शृंगारवल्लरी**—( गहिंवरून ) सखे तुझ्या भाषणानं माझ्या अंतर्यामीं कांहीं विलक्षण आनंद झाला आहे! तरी पण मला या तुझ्या भाषणाचा कांहींच उमज पडत नाहीं! आधीं मला तुझं नांव वगैरे कांहींच ठाऊक नाहीं! त्यामुळं ही **शृंगारवल्लरी** पुनःपुनः निराशेच्या आधीन होऊन तिला सर्वच स्वप्नसृष्टीचा भास होतो! व पुनः तिला तिच्या दुःखांकुराचा भला थोरला वृक्ष झालेला दिसतो!!!

**चंपकमालती**—बाई **शृंगारवल्लरी**! माझं नांव **चंपकमालती**! **देवनगरीचा कामसेन** राजा तुला ऐकून ठाऊक असेलच? त्याचा **चंद्रचूड** ह्मणून एक प्रधान आहे. त्याच्या पोटीं माझा जन्म! ईश्वरी सं-

केत कांहीं वेगळाच असतो ! व तदनुरूप आपल्या मनाची वृत्ति पालटते ! त्याप्रमाणंच तुझा सुंदर नाथ **कामसेना**कडं आला तो माझे दृष्टीस पडला ! व मी त्यावर अनुरक्त झालें ! सखे ! आपणांस इथं आतां वेळ फारच झाला ! चल आपण हळूं हळूं चालूं लागूं ! चालतां चालतां मी आपली सारी हकीकत तुला सांगतें ! अशानं आपण आपला पल्लाही बराच आटपूं ! व लौकरच राजा **विक्रमा**च्या **उज्जयनीं**त प्रवेश करूं !

**शृंगारवल्लरी**—( गहिंवरून. ) ईश्वराला माझी दया आली ! व त्यानंच मला ही आज प्रेमाची नवी बहीण दिली ! ( तिला आलिंगन देते. ) पण **चंपकमालती** ! आपण दिवसा ढवळ्या ह्या जंगलांत आहोंत तरी आपणांस इथं अंधाराचाच भास होतो ! तेव्हां असा हा अंधार कुठपर्यंत लांब आहे कोण जाणं बाई !

**चंपकमालती**—सखे ! अजून आपणांस इच्छितस्थळीं पोहोंचण्यास पुष्कळ दिवस लागतील ! इतक्यांत कंबर खचून काय उपयोग ? ईश्वर आपला पाठीराखा असला ह्मणजे ह्याहीपेक्षां अंधारांतून आपला मार्ग असला तरी आपल्यास काडीमात्र भय नाहीं !

**शृंगारवल्लरी**—प्राणनाथाच्या भेटीकरितां ह्या देहाला हवे तितके कष्ट पडले तरी पुरवले ! पण त्यांची भेट मात्र होवो ! असो. आतां आपण दोघीजणी बोलतचालत—पण सखे ! आज मी फारच दमलें भागलें आहें ! पायांतून रक्ताच्या धारा चालल्या आहेत ! व हातां पायांचे तुकडे पडले आहेत ! ह्यासाठीं एखाद्या झाडाखालीं मला डोळा घेऊं देशील तर मी पुष्कळ हुशार होईन !

**चंपकमालती**—कांहीं हरकत नाहीं ! चल ! आपण त्या आंब्याच्या झाडाखालीं जाऊं ! जागा जरा स्वच्छ करूं ! व घटकाभर तिथंच लवंडूं. ( जाऊन तसें करतात. )

**चंपकमालती**—( आपणाशीं ) हिचा तर बाई, जमिनीला अंग लागतांच डोळा लागला ! ही बाई मोठी सज्जन दिसते ! आतां माझ्या मनाला कांहीं एक धास्ती उरली नाहीं ! हिची माझी भेट झाली हें ईश्वरानं फार चांगलं केलं ! आम्ही दोघी न् तिसरी **कामकंदला** मोठ्या आनंदानं राहूं ! कांहीं दिवस गेले ह्मणजे माझ्या बाबांचाही राग

कमी होईल ! नंतर माझ्या आईचीही भेट होऊन सर्वच चांगलं होईल ! पण सध्यां **रतिप्रिया** कोणत्या स्थितींत असेल कोण जाणं ? मी असतांनाच ती वेडेवेडेचार करीत होती ! **कामसेन** तिला इकडची तिकडे फिरकूं देत नाहीं; हें तो फार चांगलं करतो ! म्यां **वसंती**जवळ तिला एक पत्र दिलं आहे तें जर कां **कामसेनाच्या** हातीं लागलं व जर **रतिप्रिया** परपुरुषासक्त आहे असा त्याच्या मनाचा ग्रह झाला तर ती ह्या मृत्युलोकीं फार वेळ राहील असं मला वाटत नाहीं ! पण देव करो व तसं न होवो ! बिचारी सुखानं आपल्या नवऱ्याचा संसार करो ! ( तिचाही डोळा लागतो. )

**राक्षस**—( येऊन आपणाशीं. ) ओः हो ! आज माझें दैव उदयास आलें ! ज्या सुंदरीसाठीं मला ही काया प्राप्त झाली तीच ही माझी **कमललोचना** असावी ! कारण हिच्या व तिच्या स्वरूपांत काडीभर सुद्धां फरक नाहीं ! व हिला पाहून माझ्या मनांत प्रेमाचा इतका कांहीं पूर आला आहे कीं, तो ह्या सुंदरीला गाढालिंगन दिल्याखेरीज कधींही थबकणार नाहीं ! ही दुसरी युवती तरी कमी सुंदर आहे काय ? जसें हिचें सौंदर्य मोहक आहे तसें हिचेंही आहे ! दोघींचीही अंगलट आम्रलतेसारखी आहे ! दोघींचेही डोळे गोकर्णीच्या फुलासारखे आहेत ! दोघींचेही केस काळेभोर आहेत ! दोघींचीही अंगकांती तप्तहेम प्रभेप्रमाणें आहे ! दोघीही सुकुमार आहेत ! दोघींचींही आननें पाहून मदनानें त्यांना आपलीं निवासस्थानें केलीं आहेत ! सारांश दोघीही अप्रतिम सुंदर आहेत खऱ्या; तथापि एकीवर प्रौढत्वाची व दुसरीवर ऐन तारुण्याची किंचित् छाया पडत चालली आहे ! त्यामुळें एक विलासक्रीडेमधें निपूण व दुसरी अनिपूण अशी भासत आहे ! येवढाच कायतो फरक ! हे स्तनच पहा ! जणों काय एकाद्या मदोन्मत्त हत्तीचीं गंडस्थळेंच होत ! पण एकीच्या स्तनांतून मदस्राव होत असल्यामुळें माझें भ्रमररूपी मन त्यांवर अत्यंतासक्त झालें आहे ! पण तीच ही दुसरी मुग्ध तरुणी ! हिच्या स्तनांत मदाचा अजून प्रादुर्भाव झाला नाहीं ! अजून हिच्यांत त्या गोष्टींसंबंधी अज्ञानच खेळत असल्यामुळें मला ही इतकी प्रिय वाटत नाहीं ! ! ही अविवाहिता दिसते व माझी प्रति**कमललोचना** विवाहिता दिसते ! हे माझे प्रति**कमललोचने** ! ह्या जन्मीं तूं

ज्याच्या पदरीं पडली आहेस व ज्यानें तुझ्याशीं ममयुक्त विलास भोगले आहेत ! तोच भाग्यसुंदर ह्या धरणीतलावर धन्य खरा ! हे सुंदरी ! सुदैवानें आज तूं मला सांपडली आहेस; त्यामुळें मला फारच आनंद होत आहे ! आतां माझ्या जन्माचें सार्थक ह्मटलें ह्मणजें मरेपावेतों तुझ्याशीं विलास भोगणें हेंच होय ! तर चल ये ! बैस माझ्या खांद्यावर अशी ! ( **शृंगारवल्लरीला** उचलून खांद्यावर घेतो ) ह्या कुमारीचा निद्राभंग आपण कशाला करावा ? आपसेंच ती जागी होऊन इच्छित स्थलीं जाईल ! कायहो किती हलकी माझी **कमललोचना** तरी ? मला तिचें कांहींच ओझें वाटत नाहीं! गुलाबाला आपल्या कळीचा कोठें भार झाला आहे काय ? ( **शृंगारवल्लरीला** घेऊन जातो ).

**चंपकमालती**—( उठून चहूंकडे पहाते. ) अँ ? **शृंगारवल्लरी** ! मला टाकून तूं गेलीस तरी कुठं ? ( इकडे तिकडे पाहत हिंडते. ) हाय हाय ! खरंच बाई ! कुठं ती दिसत नाहीं ! ( साश्रु. ) कोणी दुष्टानें तिला उचलून नेली नकळे ! बाई **शृंगारवल्लरी** ! तूं न् मी **उज्जनीस** जाऊन आपल्या प्रियकराची भेट घेणार होतों ! व तिथं जाऊन आपण आनंदानं कालक्रमणा करणार होतों ! झालं ! इथंच त्यावर व माझ्या भावी सुखांवर पाणी पडलं ह्मणायचं ! आतां मी काय करूं ? कुठं एकटी जाऊं ? ह्या घोर अरण्यांतून मला आतां एकटं जाण्यास भीति वाटते ! देवा! सोबतीला तरी आतां कोणाला हांका मारूं? **शृंगारवल्लरी** आपल्या प्रियकरासाठीं वृक्षपाषाणांला पुसत हिंडत होती ! आतां मीं तिच्याकरतां तसं करूं काय ? पण तसं करून तरी काय उपयोग! त्या बिचाऱ्या स्थावर व वाचाहीन पादपांना काय बोलतां येणार? सखे ! मी कुठं आतां तुला पाहत हिंडूं ? ( रडते. )

**श्लोक.**

**पडति तव वियोगें घाव ह्या काळजाला !**
**मम हृदयिं मिळेना ठाव कांहीं तयाला !**
**अहह ! मम सुखाचें बाइ पाणी पळालें !**
**त्वरित धरणिमाये ! ठाय दे मी निमालें ! ! !**

( मोह पावते. )

## प्रवेश ३ रा.

स्थळ—देवनगरी; प्रधान मंदिर.

पात्रें.

**चंद्रचूड**..................................कामसेनाचा प्रधान.
**कुमुद्वती**..........................................त्याची स्त्री.

(चंद्रचूड येतो. )

**चंद्रचूड**—( आपणाशीं ) शिव! शिव! सांप्रत मला मीं आपल्या हातानें स्वताच्या पायांवर धोंडा पाडून घेतल्यासारखें झालें आहे! त्या वेळेस जर मीं मौनव्रताचा स्वीकार केला नसता, तर त्या चांडाळणीचा कापट्यवेष बाहेर पाडल्याखेरीज राहिलों नसतों, व आमच्या महाराजांसही जर म्यां त्याच वेळीं दोनचार गोष्टी सांगितल्या असत्या तर मज हतभाग्यास ती माझी **चंपकमालती** शोकाग्नींत ढकलून न जाती! पण आतां काय उपयोग? बाळे! असें करणें तुला योग्य होतें काय? तूं इतक्या मृद्वंतःकरणाची असूनही जेव्हां त्वां आपल्या मातापितरांच्या हृदयास विरहाग्निचा चटका दिलास; तेव्हां तुला काय ह्मणावें? त्वां असें प्रयाण केलें तरी कोठें? मी भविष्यवादी असतों तर त्या द्विजपुत्राच्या आळती पाळतीवर पहिल्यापासूनच कांहीं मनुष्यें ठेविलीं असतीं! **गिरजे**ला शासन करून तिच्याकडून कबूल केल्यास तें षट्कर्णी झाल्यावांचून राहणार नाहीं! हाय! हाय! ह्या अब्रूला किती तरी मरावें लागतें? बाळे आम्रवृक्षासह मल्लिकालता जशी विकसित पुष्पांहीं अत्यंत सुंदर दिसते तद्वत् माझी प्रिया तुझ्यामुळें फार शोभायमान दिसे. पण एकाएकीं पोटचा गोळा नाहींसा झाल्यामुळें त्या बिचारीची कंबरच खचली. '**चंपकमालती**विषयीं सावध असा, ती एखादी तुमच्या हातची निसटून जाईल' असें **कामसेन** महाराजही माझ्याशीं तीनचारदां बोलले पण पुढची ही भवितव्यता माझ्या ध्यानीं मनींही नसल्यामुळें मला त्या बोलण्याचा मुळींच अर्थ कळला नाहीं व म्यांही होस हो करून तिकडे लक्ष्य पुरविलें नाहीं!! तुझ्या प्रयाणाविषयीं महाराजांस आधींच कळावें, व मला त्याची तिळ-

भरसुद्धां माहिती नसावी; हें केवढें आश्चर्य ! बाळे माझ्या मनांत आलेल्या शंकेप्रमाणें जर तुझा हेतु असला; तर मात्र मी दुर्दैवी खरा !

**दिंड्या.**

**प्रती मदनासम राजपुत्र बाळे !**
**कूलशीलांनीं बहुत शोभलेले !**
**तुझ्या सन्मुख तुज दाखविण्यालागीं**
**उभे होतों करणार मी अभागी ! १**
**तुझ्या अनुरुप पति निवडुनी तुवांच**
**सुखी व्हावें मम हेतु असा साच**
**बहु होता; परि हाय ! हाय ! कांहीं**
**तुवां केला तो पूर्ण नाहिं नाहीं ! २**

असो. तूं तरी त्याला काय करशील ? ब्रह्मदेवानें तुझी व त्या वेश्याकंपटाची गांठ बांधली असल्यास तुला तसली बुद्धि होणारच ! पण आपण कोणाच्या पोटीं जन्म घेतला ? आपलें कूल काय ? शील काय ? आपला मानमरातब किती ? ह्या गोष्टी, जेव्हां तूं माधवावर अनुरक्त झालीस; तेव्हां तुझ्या मनांत आल्या नाहींत काय ? फलाण्या प्रधानाची कन्या त्या वेश्यासक्तावर अनुरक्त होऊन तिनें त्याच्याशीं गांधर्वविवाह कीहो लाविला ! केवढें हें तिचें नीच कर्म ? असें जनांत रूढ झाल्यावर मग माझ्या मनाची काय स्थिति होईल; हेंहीं तुझ्या मनांत आलें नाहींना ? असो. आजपासून विरक्तता माझी सखी ! व मी तिचा सखा ! ! तूं आतां त्याच पतीसह सुखानें काळक्रमणा कर. ( श्वासोश्वास टाकीत इकडे तिकडे फिरतो. ) काय करावें ह्या प्रियेला पाहतांच पुनः जीव मायापाशांत पडतो ! ती इकडेच येत आहे, शिव ! शिव ! कन्याविरहानें काय तिची स्थिति झाली ही ?

**श्लोक.**

**न्कुसुम लतिकेचें जातसें जैं गळोनी**
**सहज पडति पर्णें त्यासवें तैं वरोनी !**
**झुरुनि ममसखीही कन्यकेच्या वियोगें**
**वरिवरिवरि ढाळी अश्रु तैशीच रागें ॥१॥**

**रडुनि रडुनि झाले आरक्त दोन्ही**
**मुखकमलहि गेलें काळजीनें सुकोनी**
**हळुंहळुं पद टाकी मत्तदंतीगतीनें**
**पदर बघुनि मातें सावरी नम्रतेनें ! ॥२॥**

उजवा हात अंगावरचा पदर सांवरण्यांत गुंतला आहे ! व डावा हात पदराच्या आड नेऊन हृदयावर ठेवला आहे! जणो काय ही कन्याविरहानें उलकेल्या हृदयास त्यानें आंवरून धरते, पण फाटलेल्या आकाशास कोठपर्यंत ठिगळें द्यावीं ? ( वर्णनाप्रमाणें कुमुद्वती येते. )

**कुमुद्वती**—( गहिंवरून ) प्राणनाथ, कायहो करूं ? कुठपर्यंत म्यां आतां धीर धरावा? अजून कांहींच थांग लागला नाहींनां ?

**चंद्रचूड**—होता तेवढा यत्न करून पाहिला ! पण दुर्दैवानें तो निष्फळ झाला त्याला कोण काय करणार ? असो. लागेल तिचा शोध तेव्हां खरा ! सध्यां मात्र ती आपणांस अंतरली आहे !

**कुमुद्वती**—काय तिचे गुण ! किती ती शहाणी ! तिचं तें हंसतमुख, तिंचे ते मंजूळ शब्द, तिनं काढलेले ते सुंदर चित्रपट, तिनं केलेलीं तीं सुंदर गाणीं, तिचा तो महाल वगैरे पाहून माझ्या उरांत धस्स होतं ! व हातपाय गळून मी खालींच बसतें! देवा ती कुठंही असो, पण सुखांत असो ह्मणजे झालं !

**चंद्रचूड**—प्रिये, तिच्या साठीं तूं आतां शीण करून घेशील तेवढा थोडाच आहे ! तथापि तुला एक सांगतों त्यावर विश्वास ठेवून ऐस.

**कुमुद्वती**—सांगा तरी कांहीं ! आपण सांगाल तशी मी राहीन. पण एकदां माझ्या **चंपकमालती**ची आज नाहीं उद्यां, उद्यां नाहीं परवां केव्हां तरी भेट होवो ह्मणजे झालं !

**चंद्रचूड**—आपल्या शोक केल्यानें काय होणार ! ईश्वराच्या घरचा नेमानेम कांहीं निराळाच असतो ! तेव्हां सध्या तूं त्यावरच सर्वस्वी अवलंबून रहा! दुसरा उपाय नाहीं ! तें असो. पण आतां तूं कोणीकडून आलीस ?

**कुमुद्वती**—आपली **चंपकमालती** हरवण्याच्या पूर्वींपासून **रतिप्रिया** आजारी पडली आहे ! पुष्कळ दिवस तिची बोलावण्यावर बोलावणीं

येत होतीं ह्मणून मी आज तिकडं गेलें होतें ! अंमळशी बसलें न् लागलीच परत आलें! ती तरी काय अगदीं बोटासारखी होऊन पांढरीफट्ट पडली आहे! हातांतल्या बांगड्या तर कोंपरापर्यंत जाऊं लागल्या! इतकीं औषधं घेते, पण काडीइतकासुद्धां तिला गुण नाहीं. तिच्यामुळं महाराज फार खिन्न आहेत!

**चंद्रचूड**—त्यांचें तें प्रेमपात्रच आहे! तेव्हां ते खिन्न होतील नाहीं तर काय करतील? ( निरखून पाहून ) पण प्रिये, तुझ्या ह्या कंचुकीच्या आंत भूर्जपत्र कसलें आहे, पाहूं.

**कुमुद्वती**—हो, बरी आठवण केली. हें मला **रतिप्रियेनं**च दिलं. आपल्या **चंपकमालतीनं** तिला कायससं लिहून पाठविलेलं ह्या पत्रांत आहे. तें तिनं अजून वाचलं नाहीं ! कारण अंगांत तितकी शक्तीच उरली नाहीं ! 'तुम्हींच हें कोणाकडून वाचून घ्या.' असं ती कण्हत कुंथत पडल्यापडल्याच मला ह्मणाली. त्यावरून मी हें इकडं आणलं ! तिला हें पत्र **वसंतीनं** कोणाबरोबर पाठविलं आहे.

**चंद्रचूड**—ह्मणजे? तिला स्वतःला नव्हतें कां तसें करतां येत?

**कुमुद्वती**—तीहि **रतिप्रिये**पेक्षां बेजार आहे. कोणी कोणी ह्मणतात कीं, कालपासून तिला किंचित् आराम पडला आहे. असो. हें पहा व मोठ्यानें वाचा ह्मणजे त्यांत काय आहे तें मला सगळं कळेल! ( त्यास पत्र देते. )

**चंद्रचूड**—( पत्र वाचतो. )

"**श्री**.

" माझी जीवलग मैत्रिण **रतिप्रिया** हीस,

" तुझ्या प्रिय **चंपकमालतीनं** तुला दृढालिंगनपूर्वक प्रेमानं फार फार
" विचारलं आहे ! गडे **रतिप्रिये** तुझी अवस्था पाहून मला फार वाईट
" वाटतं ! देवानं तुला मदनासारखा सुंदर नवरा दिला असूनही जेव्हां
" तूं त्या **माधवा**वर अनुरक्त होऊन दुखणेकरी बनलीस; तेव्हां तुला
" काय ह्मणावं ? बाई हें चांगलं नाहीं! माझं बोलणं सध्यां तुला वि-
" षासारखं कडू लागेल; पण तेंच तुला, पुढं अमृतासारखं गोड वाटेल!
" माझ्यावर तूं विनाकारण रागावली आहेस ! रागाव बिचारी ! पण

" तुला एक गोष्ट सांगतें तिकडं लक्ष्य दे ! कांहीं दिवसांपूर्वी जसं तुझं
" माझं भांडण झालं; तसंच पूर्वी **गंगा** आणि **यमुना** ह्यांचं लहानपणीं
" भांडण झालं ! कांहीं काळपर्यंत त्या एकमेकींवर रुसून वेगळ्या मा-
" र्गानं वहात होत्या ! पण ती **यमुना** ! अहाहा ! काय तिची गोष्ट ?
" गंभीर मनाच्या स्त्रियांचं मन खरोखर कोमळ असतं ! जेव्हां तिला
" **गंगे**चा वियोग सहन होईना; तेव्हां तीच होऊन धांवत धांवत आली
" व **प्रयागा**जवळ तिनं सद्गदीत होऊन **गंगे**ला जें कडकडून व तिनं
" ही **यमुने**ला जें गाढालिंगन दिलं; तें दिलंच ! त्यांची ती प्रेमाची
" मिठी म्हणून पुन्हां सुटली नाहीं ! पुढं, त्या दोघीही एकरूप बनून
" समुद्रास भेटून शांत झाल्या ! तुझीही गोष्ट **यमुने**सारखीच आहे !
" तूं मनानं थोर, स्वभावानं गंभीर, व अंतःकरणानं मृदु आहेस ! तु-
" झ्यासारखी सखी पुन्हां मला मिळणार नाहीं ! पण बाई ! तूं त्या
" मेल्या **कुसुमा**—च्या स्वाधीन होऊं नको ! जरा विवेक कर व मी
" काय ह्मणतें याचा विचार कर ! त्यानं तुला फारच त्रास दिला तर
" त्याचं गाऱ्हाणं तूं आपल्या नवऱ्याजवळ सांग ! ह्मणजे तो त्याचा
" चांगला समाचार घेईल ! ! ! ह्या विनोदाची तूं मला क्षमा कर !
" पण **माधवा**वरचं मात्र तूं आपलं मन काढून घे ! ह्मणजे तूं पापां-
" तून मुक्त होशील ! धीर धर ! ईश्वराच्या दयेनं पुढं आपण प्रति-
" **गंगायमुना** बनून ज्ञानसमुद्रास भेटूं व आमरणपर्यंत सुखासमाधानानं
" नांदूं !

" सखे ! बाबानं माझं लहानपणीं लग्न केलं नाहीं हे त्याचे मजवर
" अनंत उपकार समजायचे ! माझं जर लहानपणीं लग्न झालं असतं तर
" आज—पण तें असो मेलं आतां ! मी आपलं मन त्या **माधवास** स-
" र्वस्वी अर्पण केलं आहे ! लौकरच मी त्याच्या शोधार्थ खास निघून
" जाणार! माझ्या या साहसानं व अनुचित् कृतीनं बाबास व तुझ्या नवऱ्यास
" राग येईल खरा! पण त्याला माझा आतां निरुपाय आहे! एकदां हें मन
" त्या **माधवास** अर्पण केल्यावर बाबाच्या व तुझ्या नवऱ्याच्या ह्मणण्यावरून
" जर मीं दुसऱ्या राजकुमाराशीं विवाह केला तर **कामकंदले**त व मा-
" झ्यांत भेद तो कोणता ? निंदक हे सर्वत्र आहेतच. पण माझ्या भावी
" सुखाचा पाया अत्यंत शुद्ध असल्यामुळं मी त्यांना मुळीच भीत नाहीं !

" माझे मनोरथ पूर्ण झाले म्हणजे मी पतीसह परत येईन! व आईबापांच्या
" सहस्र वेळां पायां पडून मी कृतापराधांची क्षमा मागेन! गडे बोलतां
" बोलतां हें पत्र पुष्कळ लांबलं! आतां पुरें! माझ्या लिहिण्याचा राग
" नकोहो मानूं! सध्यां तुझी माझी हीच भेट! ईश्वर करो न् तुला लौकर
" आराम पडो!"

**कुमुद्वती**—प्राणनाथ! हें पत्र ऐकून माझी फार विलक्षण स्थिति झाली आहे! **रतिप्रियेचं** दुखणं ऐकून माझी मति थक्क झाली! व कार्टीचं साहस पाहून तर मला तोंडांत बोट घालावं लागत आहे! बाईला मी जितकी सद्गुणी व गरीब समजत होतें तितकी ती कहाबा निघाली! हाय! हाय!—

**चंद्रचूड**—प्रिये! आतां दुःख करण्याचें व संताप करून घेण्याचें कांहीं एक कारण नाहीं! तिच्या निश्चयाच्या आड येऊन जर आपण तिची निराशा करण्याचा यत्न केला तर ती आपल्या जीवास कांहीं भलतेंच करून घेईल! ती दृढनिश्चयी व समजदार आहे; यांत संशय नाहीं. जर आपणाला ती आपली एकुलती एक **चंपकमालती** पाहिजे आहे, तर तिला जें प्रिय—पण योग्य रीतीनें—आहे तें आपणां उभयतांसही प्रिय मानून घेणें भाग आहे! तिच्या शोधार्थ व रक्षणार्थ मी कांहीं नवीन हेर गुप्त रूपानें ठेवतों! पण ते तिच्या नजरेस म्हणून बिलकूल पडणार नाहींत! देवाच्याच मनांत नाहीं; तेथें तुझ्या माझ्या पश्चातापानें व विनाकारण देहास कष्टी करून घेण्यानें काय होणार! मनुष्य चिंततें एक! व दैव करतें भलतेंच! ह्यासाठीं तूं माझें ऐक!

### श्लोक.

**रूपें मन्मथ आणि गायनकलीं गंधर्वची जो असे**
**विद्येनें सकलांस तन्मय करी त्या माधवाचें पिसें**
**जीला लागुनि जी त्वरीत पतिच्या शोधार्थ गेली वनीं!**
**त्या माझ्या प्रियकन्यकेवर नको तूं रुष्ट होऊं मनीं!**

**कुमुद्वती**—अस्तु; आपली मर्जी! जशी ती आपणाला, तशी ती मलाही प्रिय आहे!

( पडद्यांत—'महाराजांनीं' आपणां उभयतांस लौकर बोलावलें आहे! रतिप्रियाबाईसाहेब फार घाबऱ्या झाल्या आहेत ! )

**चंद्रचूड**—प्रिये ! चल पुन्हां आपण तिकडे जाऊं ! ( जातांना ) असल्या कुमार्गगामी स्त्रिया आपल्या पापाचें झाडे देण्यास जितक्या लौकर जातील तितक्या बऱ्या !

( जातात. )

पडदा पडतो.

---

## प्रवेश ४ था.

स्थल—देवनगरी, कामकंदलेचा महाल.

पात्रें.

**कामकंदला**.... .... ........ ........ ........ .. ......नायिका.
**गिरजा**.............. ............ ............""तिची दासी.
**सुषेण**..............................विक्रमाकडून आलेला सेवक.

( सुषेण येतो. )

**सुषेण**—( आपल्याशीं. ) मालवेंद्र **विक्रमराज** ह्यांनीं मला आज्ञा केल्याप्रमाणें **कामकंदले**च्या महालापाशीं तर आलों ! आतां आंत जाऊन आपणांस आपलें कर्तव्य बजवावयाचें ! ( डोकावून पाहतो ) आंत तर दोन स्त्रिया दिसतात. त्यांपैकीं जिनें आपले केस मोकळे सोडले आहेत ! विरहानें जिच्या मुखावर पांडुरवर्ण येऊन गाल खोल गेले आहेत ! मनगटांतील बांगड्या थेट स्कंधदेशापर्यंत जात आहेत ! जिनें वस्त्रभूषणांचा परित्याग केला आहे ! व जी चिंतेनें व्यग्र असून मंचकावर बसली आहे तीच अभिरामा **कामकंदला**, व दुसरी स्त्री, जी तिला शीतोपचार करून वारा घालीत उभी आहे, ती तिची दासी असावी ! दोघीही उदास आहेत हें त्यांच्या चेहऱ्यावरूनच स्पष्ट दिसतें ! असो; तर आपण आतां आंत जाऊन आपल्या कर्तव्यास लागावें, हें बरें ! अरे पण ! तसें करण्यापूर्वीं—अं:! ह्या कांहीं बोलत आहेत वाटतें !—पाचीं हीं त्या **माधवा**विषयींचीं थोडीं भाषणें आडून ऐकूं !

(वर्णनाप्रमाणें **कामकंदला** व **गिरजा** येतात)

**कामकंदला**—गडे ! **गिरिजे** ! तूं माझ्यावर अनंत उपकार केले आहेत ! व ते फेडण्यास मीहि आतां समर्थ होणार नाहीं ! ह्याकरितां तुझी मजजवळ दासी ह्या नात्यानं राहण्याची योग्यता नाहीं. तूं माझी आतां सखी आहेस ! व तुला बोलावण्याचं वगैरे जेव्हां काम पडेल तेव्हां मी ह्याच शब्दाचा उपयोग करीत जाईन !

**गिरजा**—बाईसाहेब ! आपण ह्मटलंत येवढ्यांतच मी कृतार्थ झालें! आपल्या प्रेमाखेरीज मला कांहीं एक नको ! एकदां **माधवाची** व आपली भेट होऊन आपण उभयतां **चंपकमालती**बाईसह आनंदानं नांदायला लागला ह्मणजे मिळविली ह्मणायची !

**सुषेण**—**चंपकमालती** ? **विक्रमराज** ह्यांनीं **माधवाचा** विवाह ज्या नुकत्याच **देवनगरी**हून गेलेल्या **चंपकमालती** नांवाच्या मुलीशीं लाविला आहे; ती तर ही नसेल ?

**कामकंदला**—इतकी मी दैवाची कुठं आहे ? जोंपर्यंत तो मेला **कामसेन** जिवंत आहे तोंपर्यंत मला कांहीं एक संभवनीय वाटत नाहीं; इतकंच नाहीं, तर माझी या कारागृहांतून तरी मुक्तता होण्याची वानवाच आहे !

**सुषेण**—**कामसेन** हिला इतका कां त्रास देतो ?

**गिरजा**—बाईसाहेब ! आपण अमळ अंग टाका ! व्यर्थ शीण करून काय उपयोग ?

**कामकंदला**—सखे ! उपयोग तर नाहीं खराच; परंतु—

**दिंड्या.**

**बहुत झाले दिन जाउनी प्रियाला**
**मालवेंद्राच्या भव्य अवंतीला !**
**कुशलतेचें अजुनी हि परी कांहीं**
**वृत्त आलें तिकडून मला नाहीं ! १**
**स्मरण माझें करकरुनि गे ! मनांत**
**नाथ माझे असतील कष्टि होत !**

विनाकारण मी त्यांस दुःख देतें
म्हणुनि तगमग मच्चित्त बहू होतें ! २

आणि तुला तो शीण वाटतो !

**सुषेण**—खरें आहे !

**गिरजा**—आपण लवंडा तर खरे ! मी ह्या चंदनाच्या उटीचा आणखी एकदां उपचार करून आपणांला कमलपत्राचा वारा घालीत बसतें ! ह्मणजे आपणांस बरं वाटून जरा आपला डोळा लागेल !

**कामकंदला**—( तिचा हात धरून ) छे ! छे ! सखे ! केलेस हे उपचार पुष्कळ आहेत ! जास्त करण्यांत कांहीं अर्थ नाहीं ! कारण—

श्लोक.

भासे हा मज अंगराग सखये ! भल्लातकल्कापरी !
ह्यांतें कोण म्हणेल पंकजदलें ? हीं वज्रपर्णें खरीं !
जाळाया सजला खराच मजला हा ऊष्ण वारा पहा !
घे घे घे सुमहार काढुनि नको माझ्या गळां सर्प हा ! १

**सुषेण**—हाय ! हाय ! अशा अवस्थेंत मी आपलें कर्तव्य बजावून हिच्या आशेचा सर्वस्वी भंग केला तर हिची पुढें काय गत होईल ?

**गिरजा**—असं हो ! काय मेलं बाई ! याहीपेक्षां जास्त संताप करून घेतलात तरी त्याचा कांहीं उपयोग कां आहे ? चला सोडा माझा हा हात ! व घालूं द्या मला तुह्मांला वारा !

**कामकंदला**—अग जी गोष्ट माझ्या शरीरास दुःखप्रद होते, ती घटकाभर न केली तर नाहीं कां चालायचं ?

**गिरजा**—असो, मर्जी आपली ! ज्याच्या भेटीसाठीं आ आतुर झालां, त्या **माधवाची चंपकमालतीनं** काढलेली घटकाभर पहात बसा ! ह्मणजे कदाचित् आपल

**कामकंदला**—बरी आठवण केली
विसरलें होतें ! प्रियकरा ! याची क्ष
ज्या खुंटीवर माझा तो चंद्रहार उ

**गिरजा**—( ती आणून ?

**कामकंदला**—( स्वगत ) ही माझ्या जिव्हाळ्याची आहे तरी काय झालं ? हिच्या समक्ष आपल्या विरहाचे अद्वातद्वा शब्द काढणं मला बरोबर नाहीं ! व ती तसबीर पाहण्यांत मी एकदां मग्न झालें ह्मणजे मला भानही राहणार नाहीं ! यासाठीं हिला युक्तीनं इथून घालवून द्यावी न् मग आपण आपल्या मनाशीं खुशाल हवं तसं बोलत बसावं ! ( उघड ) सखे ! तुझी बहीण ती वसंती आतां कशी आहे ?

**गिरजा**—आज दोन तीन दिवसापासून—

( पडद्यांत )

'**गिरजे** ! वसंती फारच हैराण आहे ! आतां आशा नाहीं ! एकदां तिला डोळे भरून पाहायला चल ! '

**कामकंदला**—शिव! शिव! फार वाईट झालं ! जा बाई ! लौकर तिला भेट !

**गिरजा**—( साश्रु ) देवाची मर्जी ! ( जाते. )

**सुषेण**—**गिरजा** ह्या जवळच्या दारानें गेली तरी तिनें मला पाहिलें नाहीं, हें फार चांगलें झालें ! आतां **कामकंदलेचे माधवा**विषयींचे काय उद्गार निघतात ते ऐकूं आणि मग पुढच्या तजविजीस लागूं ! ती पहा त्या **तसबिरी**कडे एकसारखी टक लावून बसली आहे ! तिचे मोकळे केंस स्कंधावर व पृष्ठभागावर पसरले आहेत ! क्षणोक्षणीं डो-ळ्यांतून आश्रूधारा ढाळीत आहे ! व वारंवार त्या तसबिरीला उराजवळ नेऊन गाढालिंगनाचा आविर्भाव दाखवीत आहे !

**कामकंदला**—**चंपकमालती** ! बाई, शाबास तुझी ! जसा तो मनमोहन त्वां डोळ्यांनीं पाहिलास, तसाच त्वां हातानं लिहिलास ! त्यांत नांव ठेवण्यास त्वां काडी इतकीसुद्धां जागा ठेविली नाहींस; इतकंच नाहीं, तर आपल्या प्रियतमाचे अंगीं कोण कोणते गुण आहेत हे सुद्धां त्वां आपल्या विलक्षण चित्रकलेच्या साह्यानं पूर्णपणें दाखविलं आहेस ! सर्व राग ह्या तसबिरीस हात जोडून उभे आहेत; त्यामुळं त्वां जीवल-गाचं गानप्राविण्य दाखविलेंस ! ही जी सुंदर स्त्री तोंडांत आश्चर्यानं बोट घालून उभी आहे तीवर तूं '**रति**' अशीं अक्षरं लिहलीं आहेस ! त्यामुळं माझ्या **माधवास**, सकल विश्वास मोह घालणाऱ्या पंचशराची स्त्री पाहून ती सुद्धां लज्जित झाली ! इतकं हे माझ्या प्रियाचं सौंदर्य !

शीच ह्या बाजूला जी त्वां दुसरी स्त्री काढली आहेस तीवर **'सरस्वति'** शीं अक्षरं काढून तिच्या हातांत एक माळ दिली आहेस ! जणों काय ती **माधवा**च्या गळ्यांतच घालण्यास उद्युक्त झाली आहे; असं वाटतं ! तके माझे प्रियकर विद्वान् ! तशीच एक स्त्री **माधवा**च्या मुखकमलांत तांबूल घालीत आहे ! तीवर त्वां नांव वगैरे कांहीं एक घातलं नाहीं व प्रतिमा तर—आन् तीही लज्जाविनयांहीयुक्त !—केवळ स्वतःचीच काढली आहेस ! बाइ ! तूं असा अप्पलपोटेपणा कधींपास्नं शिकलीस ? इतक्यांतच कां तूं सवतपणा दाखवायला लागलीस ? ( जरा निरखून पहाते ) अं:?—अग बाइ ! माझी **मालती** चतुर खरी ! आपण प्रिया-च्या मुखांत लाजत लाजत विडा घालते व मी ह्या जीवलगाच्या अंगाला चंदनाची उटी लावीत आहें असं दाखविलं आहे ! पण प्रिया ! जशी ही चंदनाची उटी माझ्या अंगाचा दाह करते तशी ती सध्यां आपल्याही अंगाचा करीत नसेल काय ? अहाहा ! आपल्या ह्या भव्य व विशाळ भालफलकावर केशराचा मळवट किती चांगला शोभतो पण ? प्रिया ! हें तसबिरींतलं सुख मी स्वत: केव्हां पाहीन ? केव्हां मी आपणांस प्रेमानं गाढालिंगन देईन ? अवंतीस मला टाकून इतक्या दूर आपणांस कसं जाववलं ? तिथं जायचा आपला हेतु तरी काय असावा ? कां माझ्याविषयीं—हे माझ्या प्रियकरा !—आपण निराश होऊन अत्यंत दु:खानं तिकडं गेलां ? पुन्हां ह्मणून आपण इकडं येण्याची आशाच ठेविली नाहीं कां? असं असेल तर जळो हें माझं मनोराज्य! जळो हें माझं शरीर! व जळो हें मेलं सारं जग!!! करायाचं काय? तुह्मी जर माझ्या प्रेमाच्या सृष्टींत येण्याची सर्वतोपरी आशा सोडून माझ्यासाठीं अनिवार दु:ख करीत असाल, तर ही हतदैवा वांचून तरी उपयोग काय? प्रिया! **कामकंदला** श्रीमान् व मी दरिद्री! असं जर आपण समजत असाल तर आपणाला माझ्या प्रेमाची परीक्षाच करतां आली नाहीं ह्मणावयाची! मी द्रव्याला भाळणारी नव्हे! गुणाला भाळणारी आहें! फार तर काय? पण आपल्या केंसाला धक्का पोंहचण्याचं भय असेल तर तिथं ही **कामकंदला** आपला प्राण खर्चण्यास तयार आहे! ( तसबिरीचा मुका घेऊन. ) अहाहा! किती हा गोड? ( तिच्याकडे पहातच उत्कंठेनं )

श्लोक.

गेली कीं स्मरणांतुनी जिवलगा! ही आपली सुंदरी
जी रात्रंदिन आपणास्तव बहू होते श्रमी अंतरीं!
झाले कीं दिन फार जाउनि तुम्हां देशांतरीं राजसा!
कां नाहीं अझुनी निरोप मजला तो येत हो! योग्यसा?१

(स्तब्ध बसते.)

सुषेण—

श्लोक—चरण पहिला.

नेलें त्वहृदयास चोरुन जयें त्या उज्जनी भीतरीं!

**कामकंदला**—( चकित होऊन चहूंकडे पहाते ) अं:? कोणाचा हा शब्द? ही वाणी ऐकून तर माझं काळीज धडधडायला लागलं! (मोठ्यानं ) माझं अंतःकरण चोरून नेणारा एक उज्जनीस आहे खरा! पण पुढं? ( लक्षपूर्वक कान देऊन ऐकते. )

सुषेण—

चरण दुसरा.

होई चंपकमालतीस वरुनी सानंद जो अंतरीं!

**कामकंदला**—( आनंदानं ) अहाहा! देवा! हे खरं असेल कां? विक्रमराजानं कृपाळू होऊन माझ्या प्रियाला आश्रय दिला व माझ्या प्रिय **चंपकमालतीला** तिचा निश्चय व विधि अनुकूल होऊन वांछित वरच मिळाला हें ह्या आनंददायक बातमीवरून सिद्ध आहे! प्रियानें मला उज्जनीस नेण्याकरितां हेर पाठविला खचित! ( लगबगीनें आपलीं वस्त्रें सांवरून ) बरं पुढं?

सुषेण—

चरण तिसरा.

जो नेणार तुला अवंतिनगरीं येऊन येथें त्वरें!

**कामकंदला**—शाबास! आपल्या प्रियकरणीचा मान राखावा तो असाच! ह्या वेळेस माझ्या मनांत आनंदाच्या उकळयावर उकळ्या येत असल्यामुळं मला आतां सारंच रमणीय दिसूं लागलं! चित्तास हुशारी

वाटूं लागली! तोंड प्रफुल्लित झालं! आनंदानं माझ्या डोळ्यांतून प्रेमाश्रु येऊं लागले! प्रिया! मीं जो मघां आपणास विस्मृतीचा दोष दिला त्याची मला क्षमा करा! कधीं आपण इथं याल? कधीं या डोळ्याचं पारणं फिटेल? आपल्या देहाम्रतरूस ह्या माझ्या प्रेमातुर करलता कधीं अलिंगन देतील? हे आनंदवृत्त कळविणाऱ्या हेरा! लौकर माझ्या दृष्टीस पड! व तुला झालेल्या श्रमाबद्दल ह्या पारितोषकाचा स्वीकार कर! ( मोत्याचा कंठा हातांत घेते. ) आणि माझ्या प्रियकराचे आणखी निरोप व कुशल कळीव !

**सुषेण**—( दुःखोद्गारानें ) हाय ! हाय ! !

**चौथा चरण.**

**आतां येइल गे! निरोप कुठला त्या माधवाचा बरें?॥१॥**

**कामकंदला**—( चपापून ) कोण मेला माझ्या प्रेमानंदामृतांत हें दुःखोद्गार वीष टाकीत आहे?

**सुषेण**—( प्रवेश करून ) हे वेश्ये! तूं मला क्षमा कर! तुझ्या विधिविपर्ययानें तुझ्या भावीसुखाच्या पंचपक्वान्नांत तवाशाभंगमृत्तिका कालविण्याचें मजकडे सोंपविलें आहे; त्याला माझा निरुपाय आहे! सुंदरी! मी अवंतींत राहणारा **विक्रम**राज्याच्या आज्ञाधारक सेवकांपैकीं एक आहें! त्यानें हा समाचार कळविण्यास मला तुजकडे पाठविलें आहे! माझें नांव **सुषेण!**

**कामकंदला**—बा सुषेणा! तुझ्या या संदिग्ध भाषणाचा मला कांहींच उमज पडत नाहीं! काय असेल तें स्पष्ट बोल!

**सुषेण**—(साश्रु ) **काय** बोलूं बाले!

**ओवी.**

**ऐक ऐक कमलनयने !, कनकलतिके ! अंबुजवदने !**
**माधवानें त्वद्विरहानें!, प्राणोत्क्रमण पैं केलें ! !**

**कामकंदला**—( धरणीवर अंग टाकून साश्रु ) हाय ! हाय ! देवा माझ्या मनोरथदुर्गावर ह्या असह्य दुःखाशनीचा प्रहार करून त्याचा एकदम चुराडा कसा केलास? असले मी अन्याय तरी कोणते केले? यदाकदाचित् न कळतां माझ्या हांनून तुझे अन्याय झाले असतील तर तें

माझ्या अज्ञानामुळं झाले असतील! आईला जशीं सारीं लेकरं सारखीं; तशीं तुला सारीं माणसं सारखीं ! असं जर आहे तर देवा माझ्यावरच येवढा कोप कां? त्वां माझी ही सारी धनदौलत हरण केली असती! मला नानातऱ्हेचे क्लेश दिले असते! फार तर काय? पण प्रत्यक्ष त्वां माझा प्राणही हरण केला असता तरी तो मला पुरवता! परंतु माझ्या काळजांत तूं दुःखाचा भाला खुपसून ज्यास, मला इथंच टाकून, आपल्या पायांजवळ नेलंस, त्या माझ्या प्राणप्रिय **माधवा**वांचून मी अगदीं दीन झालें! प्रिया ! गुणीजन सर्वांनां प्रिय असतो तर तो देवाला तरी प्रिय कां न होईल? तथापि माझी आपणांस कांहीं तरी कींव यायची होती! एकदम मला टाकून आपणांस अतिदूर असणाऱ्या स्वर्गलोकीं कसं जाववलं ! आतां मी काय करूं ? या जगांत मला आतां कोण मित्र आहे ? आपण गेलांत तर गेलांत ! पण मला ह्या भयंकर बंदांत कसे टाकून गेलांत ?

**श्लोक**

**नसेल नवनीतही मृदु जयापरी मत्प्रिया !**
**बने कठिण तें अहो ! हृदय आपलें कांसया ?**
**प्रमाद घडला असे मजकडूनि हो ! राजसा ?**
**जयें बनुनि निष्ठुर त्यजुनियां मला जातसा?, १**
**तुम्हांस अवमानिलें भरसभेंत माझ्यामुळें !**
**बळेंकरुन मूर्च्छित प्रियकरा ! तुम्हां पाडिलें !**
**स्थितींत असुनि तशा उचलुनी तुह्मां कोंडिलें !**
**तयाच परमाधमें मनिं विषादुनी त्रासिलें ! २**
**खरेंच मजसाठिंहो ! अतिशय प्रिया भागला!**
**म्हणून चरणानुरक्त सखिच्यावरी कोपला ?**
**त्यजील जर आम्र तो मृदुलतेप्रती कोपुनी**
**बघेल तर बापुडी वदन ती कुणाचें जनीं ? ३**
**जरी असलि ती लता परम सुंदरी यन्महीं**
**लहून कुसुमेंकरून दिसली बहू रम्यही**
**परंतु जर तो नसे कवळण्या तिला आम्र हो !**
**तिचें विफल जीवित प्रियकरा ! तथीं कां नहो ? ४**

तशी विफल जाहली प्रियतमा ! प्रिया आपला
जिला जगातें ह्या नसे तिळहि राहण्या सावली !
अहा ! करुन दीनहो ! मजशिं चालला कां सया ?
सुरेंद्रवर-मंदिरीं चिरसुखास सेवावया ? ५
मलाच गणिकोदरीं जर न जन्म येता प्रिया !
तुम्हास तर जाहली नसति दासिही अप्रिया !
परंतु जर आपलें मजवरी असे प्रेम तें !
तयास तर शुष्क कारण असें कसें शोभतें ? ६
गडे ! कळुनि आपलें मजशिं मौन आलें असे
पुरे प्रणयकोप हा ! मजशिं लागलें त्वत्पिसें !
असें भुवनसुंदरा ! खचित योग्य तुम्हा नव्हे !
करा मजशिं भाषण प्रियतमा गडे ! काय हें ? ७
विनंति करुं मी तरी कितिक माधवा ! आपली
तुम्हांचकरतां सखी बहुत भागली भागली !
चला मजशिं आवळा हृदयिं आपल्या या गडे !
अहो ! करुन मुक्तकंठ बहु बापुडी ही रडे ? ८
करून मुख दीन म्यां सतत रोदना मांडिलें !
शिलेउपरिं आपटून शिर हें जरी फोडिलें !
प्रचंड सुरिनें जरी चरचरा गळा कापिला !
प्रिया ! तरिहि जीव कां हळहळेल हो ! आपला ? ९
अहो ! करुनका असें कठिण आपलें चित्त तें
जयाविण मला बहू जगत शून्य हें वाटतें !
असाल रुसला जरी मजवरी प्रिया ! अंतरीं !
क्षमा मजशिं हो करा प्रथम एकवेळां तरी ! १०

शिव ! शिव ! कसलं रुसणं आणि कसली क्षमा ! माझे प्रियकर ह्या दीन कुरंगीला **कामसेन** व्याघ्राच्या जाळ्यांत सोडून अजीबात गेले ते गेले! आतां माझी काय गत होणार ? सरतेशेवटीं माझी मनोरथनौका दुःख-समुद्रांत बुडाली ना ? अरे **सुषेणा** ! विषपूर्णपात्राच्या तोंडावर थोडंसं अमृत टाकून तें जसं एखाद्या दैवदुर्विलासास प्यायला देऊन त्याला हा-लहाल करून ठार करावं; तद्वत् तूं मला प्रथमतः आशा लावून अमृ-

तासारखीं गोडगोड दोनतीन वचनं बोलून अंतीं मला हें विषाहीपेक्षां असह्य असं वृत्त कळवून ह्या अबलेला सर्वथैव दीन केलंस ना? विष पिऊन मरण येतं पण तुझीही दुर्वार्ता ऐकून मला तें भिऊन पळतं! हाय! हाय! ह्यापेक्षां बा **सुषेणा**! त्वां एकदम येऊन ह्या अनाथेचे तरवारीनं तुकडे तुकडे करायचे होतेस! पण तूं तरी बाबा तसं कां करशील! तुला तसली बुद्धि कोठून होणार! मला आणखी दुःख झालं पाहिजे ना! बा मृत्यो! माझी ह्या जगांत राहण्याची सगळी हौस फिटली! आतां लौकर ये व मला वेऊन जा! आईग! आई! बुडालें ग मी सर्वस्वी!!

( मोह पावते. )

**सुषेण**—शाबास **कामकंदले**! शाबास! धन्य आहे तुझी! व धन्य आहे त्या **माधवा**ची! खरी तुह्मा उभयतांची प्रीति! त्वां वेश्येच्या पोटीं जन्म घेतलास ह्मणूनच लोक तुला वेश्या ह्मणतात! बाकी तुझी योग्यता खरोखर कुलीन स्त्रीसारखीच आहे यांत संशय नाहीं! 'वेश्या' शब्दाचा जो अर्थ आहे त्याप्रमाणें जर तूं असतीस तर आजपर्यंत त्वां—**माधव** तर राहोच; पण **कामसेना**सारख्यांसुद्धां-कित्येक कामी पुरुषांस फसवून देशोधडीं लाविलें असतेंस! कित्येकांचे गळे त्वां कापिले असते! कित्येकांचे संसार त्वां मातीस मिळविले असते! कित्येक साध्वींच्या अभिश्रापांच्या अगणित माला तुझ्या गळ्यांत सतत लोंबत असत्या! दुर्गुणी व कुमार्गगामी स्त्रीपुरुषांचें हें विहारमंदिर झालें असतें! पर्वतासारखे द्रव्याचे ढीग तुझ्या दारापुढें पडले असते! त्वां मदांध होऊन पाहिजे त्याला लातेनें झुगारून दिलें असतें! जुगाराचें हें माहेरघर बनलें असतें! मदिरादेवी तुझी प्रियसखी झाली असती! मांसाहार सर्वांना प्रिय होऊन कित्येक गोवत्सांचे व बकरींचे गळे चरचरा कापले असते! गेले कित्येक स्त्रियांच्या पातिव्रत्याची धूळधाण झाली असती! शेंकडों जन तुझ्यापायीं अनाथ होऊन पश्चात्तापपूर्वक कृतकर्में आठवून धायधाय रडत बसले असते! सारांश तूं तशाच प्रकारची असतीस तर तुला तुझ्याप्रमाणें आणखी मदांध व कुमार्गगामी स्त्रीपुरुषांची विपुल साह्यता मिळून त्वां एकच कहर करून सोडला असता! तथापि तुझ्या लक्षणांवरून एकंदरीनें पाहतां तूं तशी नसून, सुशील, अत्यंत थोर व मृदंतःकरणाची आ-

हेस हें कळून आलें ! **विक्रम** राजाच्या आज्ञेनें म्यां तुझ्यासारख्या सज्जन स्त्रीला विनाकारण दुःख देऊन मूर्च्छितही पाडलें याचें मला आतां फार वाईट वाटत आहे !. अहाहा ! काय हो तुझी स्थिति ! दुःखानें धाडकन् जमिनीवर अंग टाकलेंस तथापि त्या सुदैवी **माधवा**ची तसबीर ज्यांत भक्कम बसली आहे तो मृणालनालासारखा अत्यंत मृदु वामकर उत्तुंगपीन कुचयुग्माच्या मध्यावरच आहे ! मुकुलित कमलाप्रमाणें त्वां आपले डोळे मिटवून घेतले आहेस ! ह्मणून ते दुःखाश्रूंच्या अगणित धारा गेल्यानें खोल गेल्यासारखे भासतात ! जणों काय लावण्यसरोवरांत हीं कमलें बुडून गेलीं आहेत ! गाल तर खोल गेलेच आहेत तथापि ते अश्रूंनीं थबथबल्यामुळें त्यांत ह्या कर्णभूषणांचें कसें ठाम प्रतिबिंब दिसतें ! शिव! शिव ! ह्या हिच्या मुखकमलावर तर शुद्ध प्रेताचीच कळा आली आहे ! हिचे केंस तरी पहा कसे अस्ताव्यस्त पडले आहेत ते ! हिची ही स्थिति मला आतां पाहवत नाहीं ! **कामकंदले** ! सावध हो ! ( तिच्या डोळ्याला पाणी लावून वारा घालीत बसतो. )

**कामकंदला**-( किंचित् सावध होऊन साश्रु )

**पद.**

(चाल—नको नको हें साहस ऐसें०)

**चला चला या मजला न्यायाः प्राणसख्या ! पायाशीं !**
**तुम्हावीण जाहली फार हीः दुबळी त्वद्दासी !॥ध्रु०॥**
**नकळे सखया ! कोठें गेलाः टाकुन ह्या रमणीला !**
**त्रिभुवन मी पालथें घातलेंः थांग परी न हियेला !**
**सांगा आतां जाऊं कोठेंः शोधाया तुह्माशीं !**
**असेल छळणें छळा परंतुः मज न्या पायाशीं ! १**
**अबला स्त्रीची छळणा करणें सबलाला लांछनहो !**
**म्हणुनि तुम्हा ही दीन बापुडीः अप्रिय कधिंहि नहो !**
**गडे ! स्मरा पूर्विंचा प्रेमाः पाझर सुटुं द्या हृदयाशीं !**
**सोडा सोडा राग मनांतिलः मज न्या पायांशीं २**

**सुषेण**—**कामकंदले** ! सावध हो ! सावध हो ! नीट शुद्धीवर ये!

**कामकंदला**—( उठून ) अजून तूं इथंच आहेस कां ? आतां तूं माझ्यावर कृपा कर. व येथून चालता हो! हाय! हाय! त्या बापड्या **चंप**-

कमालतीची तरी काय स्थिति झाली असेल! त्या परदेशांत तिला आतां कोण आहे? देवा! तिला स्त्रीसाहसाचं हें फळ दाखविलंस काय?

**सुषेण**—तूं ह्मणतेस तर मी आपला चालता होतों बापडा! पण तुझा आतां हा शोक पुरें कर! झालेल्या गोष्टीस उपाय नाहीं! ह्मणून मला विक्रम राजांनीं तुला सांगण्याकरितां जो निरोप सांगितला आहे तो ऐक!

**कामकंदला**—( कांहींच बोलत नाहीं. )

**सुषेण**—तुझें माधवावर प्रेम फारच आहे व त्याचेंही तुजवर तसेंच आहे! तथापि आपली योग्यता, आपलें रूप, आपले गुण, अपला लौकिक इत्यादि गोष्टींकडे त्वां दुर्लक्ष करून आपलें सर्व तनमनधन त्या यःकश्चित द्विजपुत्रास अविचारानें अर्पण केलेंस हें त्वां फार अनुचित कर्म केलेंस असें ह्मटलें पाहिजे! माधव तो काय? त्याची योग्यता कोणती? त्याचा स्वभाव कोणत्या प्रकारचा? सारासार विचारशक्ति त्याच्या अंगीं किती आहे? समयसूचकता ही त्याजपाशीं किती आहे? वगैरे गोष्टी त्वां प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिल्या असूनही जेव्हां त्यावर तूं इतकी फिदा झालीस तेव्हां तुला काय ह्मणावें? नृत्यशाळेंत जयसिंगा करवीं कामसेनानें जी त्याची संभावना केली तिवरून त्याचें एकंदर लक्षण तुझ्यासारख्या चतुरस्त्र वेश्येस कळून आलें नाहीं; हें लहान कां आश्चर्य? अगे! तो तुझा माधव किती नीच व हलकट—

**कामकंदला**—(संतापून मध्येंच) अस्सं! अस्सं! ! आतां तुझा कावा माझ्या लक्षांत आला! तूं इतका अधम आहेस व दुसऱ्याची निंदारूपी** आपल्या जिभेनें चाटणारा आहेस; असं जर मला पहिल्यानूदाच समजतं तर म्यां तुला ह्या महालाची पायरीच मुळीं चढूं दिली नसती! अधमा! आतां तूं आपलं इथून लौकर काळं केलंस तरच बरी गत आहे! माझ्याशीं रे मेल्या तुला काय करायचं आहे? मी पाहिजे त्यावर फिदा होईन किंवा नाहीं होणार! तुला मात्र मी कध्धीं—कध्धीं वश होणार नाहीं हें खूब लक्षांत ठेव! चल! आतां पुरें! फार दमलास! आल्या रस्त्यानं मात्र आतां लौकर परत जा! जातोस कीं नाहीं? कां घेऊं ती सुरी नू खुपसूं तुझ्या उरांत?

**सुषेण**—( स्वगत. ) **विक्रम** राजांनीं सांगितल्याप्रमाणें आपला कार्यभाग तर आटपला! सरतेशेवटीं सोनें बावन कसीच ठरलें! शिवाय येथें आपली आणखी डाळ शिजेल असें वाटत नाहीं! ( उघड. )अस्तु. **कामकंदले**! इतकी संतापतेस कशाला? कालांतरेंकरून हेच माझे शब्द तुला अमोलसे वाटतील! मी आतां जातों.तथापि म्यां तुला विनाकारण जे क्लेश दिले त्याची तूं मला आणखी एक वेळ क्षमा कर! सर्व वार्ता असत्य ठरतील पण मरणवार्ता कधींही असत्य ठरत नाहीं हें मात्र पूर्णपणें लक्षांत ठेव! ( जातो. )

**कामकंदला**—हाय! हाय! मेला गेला पण जातां जातां ह्या वाक्दुर्बाणांनीं माझ्या हृदयास ताडण करून गेला! प्रिया! हा मार मी आतां कुठवर सहन करूं ? आपला वियोग मला घटकाभरही सहन होत नाहीं! माझं सारं अंग आतां शिथिल पडल्यासारखं झालं आहे ! व शरीराचे इतर व्यापारही बंद होतील असं वाटतं ! देवा ह्या त्रासांतून मला लौकर मुक्त कर !

**श्लोक.**

**प्रियकर मज गेला टाकुनी स्वर्गलोकीं !**
**प्रियकर उरलें ना कांहिही मर्त्यलोकीं !**
**छळणुक विधिचीही संपली नाहिं देवा !**
**म्हणुनि न करिं माझा तूं तरी अंति हेवा ! १**

( मूर्च्छित पडते. )

पडदा पडतो.

---

## प्रवेश ५ वा.

### स्थल—रतिप्रियेचा महाल.

**पात्रें.**

**कामसेन**.................................देवनगरीचा राजा.
**रतिप्रिया**.................................त्याची स्त्री.
**सुमुखी**.................................दूती.

( संतप्त झालेला **कामसेन** हातांत खंजीर घेऊन येतो. )

**कामसेन**—काय चमत्कार पहा ! अजून मीं ह्या महालाचा उंबरठा ओलांडला नाहीं तोंच माझें काळीज धडधड उडायला लागलें ! व हा-तापायांस कंप सुटूं लागला ! हृदया ! इतक्यांतच तूं धैर्य सोडूं नकोस ! त्वां केलेला निश्चय एकदां तडीस गेला ह्मणजे गंगेंत घोडे न्हाले ह्मणा-यचे ! हे विषयासक्ता **कामसेना** ! आजपर्यंत जिच्यावर तुझें अतिशय प्रेम असे, जी तुझ्या विश्रांतीची प्रियसखी होती, जी मनांतून त्या नीच द्विजपुत्रावर व वरकरणी तुझ्यावर प्रेम करीत आहे, व जिची दुर्दशा बघून तुझ्या मनास चैन ह्मणून बिलकुल नसे, त्याच प्रतिविश्वयोषिता **रतिप्रिये**च्या उरांत आज हा खंजीर खुपसून मोकळा हो व इतःपर तिला, त्या मदनाला व स्वतः तूं आपल्याला धिःकारून ह्या जगाचा संबंध सोड ! राज्यभाराचें जें जूं तुझ्या खांद्यावर आहे; तें खालीं टाक ! व निरिच्छ बनून योगी हो ! अथवा नंतर ह्याच खंजीर तूंही आपल्या उरांत खुपसून मर ! हाय ! हाय ! अगे ! चांडाळणी ! असलें नीच कर्म करण्यास तूं पुढें उद्युक्त होशील; असें जर मला समजतें तर, तुला मी मुळींच वश झालों नसतों ! माझ्या प्राप्तीकरितां त्वां तऱ्हातऱ्हा केल्यास ! गुप्त हेर पाठविले, दूती पाठविल्या, शेंकडों मदनलेख पाठविले ! कित्येक करुणात्मक लेख पाठवून तूं आपल्याविषयीं माझ्या मनांत कळवळा उत्पन्न करून माझ्या डोळ्यांतून अश्रू तर पाडलेस ! इतकेंच नाहीं, तर विवाह होण्याच्या पूर्वींच त्वां वेळ साधून व मला एकांतांत गांठून माझ्या गळ्या-स मिठी मारलीस ! आणि त्याचें आतां हेंच का फळ देतेस ? त्या **चंद्रचूडानें** मला वेळेवर जागें करून तुझ्या अति निंद्य आचरणाचें हुबेहुब चित्र दाखविलें, यामुळें मी त्याचा फार ऋणी आहे ! ती **चंपक-मालती**, गे नीचे ! तुझीच सखी, व तुझ्याच नवऱ्याच्या शत्रूवर अनुरक्त झालेली ! पण ती सांप्रत मला जितकी वंद्य व प्रिय आहे, तितकी तूं अधमाधमा मला निंद्य व अप्रिय आहेस ! तूं आतां आपल्या जिवाची व त्या **माधवा**पासून प्राप्त होणाऱ्या भावी सुखाची आशा सोड ! आणि आपल्या पापाची व कपटाची झडती देण्याकरितां यमलोकास चालती हो ! ह्या वेळेस दोन प्रहर रात्रीचा सुमार असल्यामुळें चहूंकडे सामसूम झाली आहे ! वारा अगदीं नाहीं, तरी ह्या सुवर्णवसंत बागेंतल्या एकून-

एक फुलझाडांचीं पानें व फुलें हालत आहेत! कां बरें असें ? कां आतां पुढें जो भयंकर प्रकार घडणार आहे त्याची कल्पना आधींच यांच्या मनांत येऊन हीं भयानें कांपत आहेत? तद्वत्, सध्यां मी जेथें उभा आहें तेथें हळूं जरी बोललें तरी आपला प्रतिध्वनि निघायचाच! पण आज तोही निघत नाहीं!! त्याला सुद्धां त्या भावी प्रसंगाची धास्ती पडली ह्मणायची!!! हा चंद्रच पहा! क्षणोक्षणीं ढगाआड लपत आहे! असो; आतां काळाचा व्यय विनाकारण करण्यांत कांहीं उपयोग नाहीं! अनीतीनें नखशिखांत भरलेल्या चंद्राच्या वैभवाची, सोन्याच्या कांतीची, गजाच्या गतीची, कुंदाच्या कळ्यांची, अधराच्या अमृताची, मदनाच्या सुवर्णकलशद्वयाची, सिंहाच्या कटीची, रंभेच्या ऊरुंची, मृणालांच्या कोमल नालांची, वाणीच्या माधुरीची, सारांश, जगांतील एकंदर रमणीयतेची आतां एका घटकेंत माती होणार ना! ( दचकून मागें पाहतो. ) अरे! पण ही कोण स्फुंदत स्फुंदत ह्या महालांतच जात आहे! आपण आपलें सध्यां एकीकडे होऊन ही आंत जाऊन काय करते हें हिच्या मागोमाग जाऊन पाहूं. ( एक स्त्री येऊन जाते. ) ती पण सपाट्यानें आंत गेली हीं! ( जरा चालल्यासारखें करतो. ) ती कौटिल्यनिपुणा पलंगावर पूर्वस्थितींतच पडली आहे! पण तो नीच प्राणही तिला अजून सोडीत नाहीं. शब्दाबरोबर तिचे डोळेही खोल गेले आहेत! सुखेनैव जावोत! आणखी जावोत! त्या अधमाच्या विरहानें तिचा केवळ अस्थिपंजर उरला आहे. पण त्याची सर्वभक्षक अग्नि अजून आहुति घेत नाहीं! मी जीवंत आहें! परंतु तिच्या कपाळावर कुंकू अथवा केशर ह्यांपैकीं कांहींच नाहीं. प्रेमाचा रंग लाल! तेंच जेव्हां माझ्याविषयीं तिच्या मनांतून पराङ्मुख झालें तेव्हां तिच्या कपाळावर अभद्रासारखें कुंकू तरी कसें राहवें! अगे जारिणी! मीं तुझे कधीं तुकडे तुकडे करीन असें मला झालें आहे! बा दक्षिणकरा! जरा धीर धर! खंजिराला संभाळून ऐस. व ह्या दोघींचा आतां कसा काय संवाद होत आहे तो घटकाभर ऐकत बैस.

( वर्णनाप्रमाणें **रतिप्रिया** पलंगावर निजलेली व **सुमुखी** तिच्याजवळ उभी असलेली अशा दृष्टीस पडतात. )

**रतिप्रिया**—मला आतां बोलायची शक्ति उरली नाहीं! तिकडलं वर्तमान कसं काय आहे? तुझा चेहेरा असा रडवा कां दिसतो?

**सुमुखी**—बाई साहेब ! आपल्या आज्ञेप्रमाणें मी **कामकंदलेकडं** गेलें! तों म्यां तिला मूर्च्छित पडलेलं पाहिलं!पुष्कळ प्रयत्न केले तेव्हां ती कुठं सावध होऊन बसली! व आपली माझ्या कंठास मिठी मारून "अग **सुमुखे** ! आतां मी काय करूं ? माझा सर्वस्वी घात झाला ! " असं ह्मणून एक सारखी रडत सुटली ! तिची ती दीनावस्था पाहून मलाही बाई रडायला आलं !

**कामसेन**—अजून तिचा घात झाला आहे कोठें ?

**रतिप्रिया**—( निराशेनें ) काय बाई ह्मणतेस तूं ? मला कांहींच समजत नाहीं ! कोणा मेल्यानं तिचा घात केला ?

**सुमुखी**—दैवानं !

**रतिप्रिया**—ह्मणजे ?

**सुमुखी**—( तिच्या कानांत कांहींसें सांगते. )

**रतिप्रिया**—( दुःखानें ) काय ?

**पद.**

( अजीं अक्रुर हा नेतो श्रीकृष्णाला; या चा० )

**वा दुर्दैवा ! काय तुवां हें केलें ?**
**भंगून मनोरथ गेले ! ॥ ध्रु० ॥**
**मत्सौख्यलतामंडप हा वाढून**
**तच्छायेतलिं नांदेन !**
**हें तनमन मी या सखया अर्पून ॥**
**होइन जगीं बहु धन्य ! ।**

( चाल बदलून. )

**हे हेतु परी जिरवून**
**केलें त्वां मजला दीन !**

( चाल पहिली. )

**त्वां धरणीला भारभूत मज केलें !**
**त्या प्रिया जयें अंतरलें ! ॥ १ ॥**

हाय ! हाय ! वा **माधवा** ! आजपर्यंत माझ्यासारख्या किती त-

रुणी आपणांस पाहून निराशेनें-व शेवटीं आपल्या मृत्युवार्तेनें-आंतल्या आंत भाजून ठार झाल्या असतील? व होतील ?

( मूर्च्छित पडते. )

**कामसेन**—( येऊन; शांतपणें ) आज आपणावर आकाशाची कुऱ्हाडच पडली आहे; त्यामुळें माझ्या काळजाचे शतशः तुकडे झाले आहेत ! त्वां मजवर आज फार उपकार केले आहेत ! याकरितां आतां ऊठ आणि येथून मुकाट्यानें चालती हो !

**सुमुखी**—महाराज ! हें कां आपण माझ्याशीं बोलत आहां काय ?

**कामसेन**—होय; होय ! तुझ्याशीं ! **कामकंदले**कडून **माधवा**च्या मरणाची वार्ता आणणाऱ्या **सुमुखी**शीं !

**सुमुखी**—बाईसाहेबांस अशा अवस्थेंत टाकून मी इथून कशी चालती होऊं ?

**कामसेन**—( स्वगत ) हिला भीमरूपच दाखविलें पाहिजे. ( उघड क्रोधानें ) बाईसाहेब ? कोणत्या बाईसाहेब? आहेत कोठें त्या बाईसाहेब? होत्या बाईसाहेब त्या मेल्या ! व तूंही मर, चल निघ इथून ! जर इथून निघून मी काय करीत आहें हें लपून पाहत उभी राहशील, अथवा असलीं निंद्य कर्में करून त्यांचीं प्रायश्चित्तें पुढें तूं उघडकीस आणण्याचा यत्न करशील तर अधमे ! तुझे तिळा येवढे तुकडे तुकडेच झाले समज! चल गेलीस कीं नाहीं अजून ?

**सुमुखी**—महाराज ! आपण याहीपेक्षां मला दरडावलंत तरी मी कांहीं भ्यायची नाहीं ? आपण कोणतं निंद्य कर्म केलं व तें मीं कधीं उघडकीस आणलं ?

**कामसेन**—नीचे ! ( लत्ताप्रहार करून तिला घालवून देतो. )

**रतिप्रिया**—( सावध होऊन खोल आवाजानें. ) प्राणनाथ ! आपण असे कष्टी होऊं नका ! **सुमुखी** कुठं आहे ? तिला म्हणावं मला आतां मांडी दे !

**कामसेन**—तिला मी औषध आणण्याकरितां पाठविली आहे !

**रतिप्रिया**—असो. पण आपण मात्र माझी आशा सोडा !

**कामसेन**—( स्वगत. ) आतां विलंब लावून उपयोग नाहीं ! (उघ-

ढ. ) आणि मीं कधीं तुझी आशा धरली होती ? दुर्दैवानें तुझे हेतु जागचे जागीं जिरवून टाकले त्याला कोण काय करील ? हा खंजीर मात्र कांहीं करील तर करील ! तुझा जन्म मात्र थोर कुळांतला ! पण तुझें वर्तन पाहिलें तर नीचाहूनही नीच होय ! ह्यासाठीं तुला स्वभाविकपणें मरण येऊं देतां उपयोगीं नाहीं ! तुला हालहाल करूनच मारलें पाहिजे ! सध्यां तुझा जीवलग तो **माधव** एकीकडेच राहूं दे ! पण आतां रुक्मिणी हो तूं ! व मृत्यु होईल तुझा **कृष्ण** ! ( खंजीर काढतो ) त्वां ही सुरी उरीं खुपसून घेतलीस ह्मणजे ज्याच्यावरून प्राणही ओवाळून तूं टाकणार होतीस तोच मृत्यु तुला सत्वर घेऊन जाईल !

**रतिप्रिया**—( भयभीत होऊन दीनस्वरानें )तर प्राणनाथ ! आपण कां माझ्या उरांत खंजीर खुपसरणार?

**कामसेन**—छिः! भलतेंच एखादें?रुक्मिणीला कृष्णाकडे पाठविणार!

**रतिप्रिया**—मी आपणांस शरण आहें! म्यां करूं नये तें केलं!तथापि त्याची एकवेळ क्षमा करणं आपणाकडे आहे!आपलं मजवर किती प्रेमः—

**कामसेन**—(त्वेषानें) आणि त्याचा तूं असा परिणाम केलास! ! !

( तिच्या उरांत खंजीर खुपसतो )

**रतिप्रिया**—देवा! माझ्या कर्माचं मला योग्य फळ मिळालं ! आतां माझ्या प्राणनाथाचा पाठीराखा तूंच आहेस! कितीही गुप्तरीतीनं पाप केलं तरी त्याचं तूं असंच बक्षीस देणार! प्राणनाथ! त्या मदनस्वरूपी **माधवास** पाहिल्यापासून म्यां आपणाशीं कपटाची वर्तणूक ठेविली होती खरी ! पण त्याचा मला आतां फारच पश्चात्ताप होत आहे! हाय ! हाय! मला बोलवत नाहीं!

**कामसेन**— (गहिंवरतो )

**रतिप्रिया**—आईग! फारच तिडका लागल्या!काय हा रक्ताचा पाट !मला एकदां आपणांस डोळे भरून पाहूंद्या! (तसें करतें ) आतां मी जा—जातें! आ— (गुचकी लागून प्राण जातो. )

( पडदा पडतो. )

# प्रवेश ६ वा.

स्थळ—कारागृहाची एक खोली.

**गिरजा**—( येऊन. ) एकदां माणसाला दैव प्रतिकूल झालं ह्मणजे त्यावर हरतऱ्हेचीं संकटं येतात! ज्यांची मी मनापासनं सेवाचाकरी करून ज्यांना आनंदाचे दिवस आणण्यासाठीं दीर्घ परिश्रम करीत होतें; त्या माझ्या उदार व थोर **कामकंदला** बाईसाहेबांची आतां काय गत होणार? त्यांची सेवा करतां करतां हा प्राण जरी जाता तरी पुरवता! पण हाय! हाय! ( साश्रु ) मधीं एक तिसरंच संकट येऊन उभं राहिलं! बिचाऱ्या **वसंती**वरच दुष्ट मृत्यूनं घाड कां न घालावी? माझ्या त्या प्रिय भगिनीच्या अखंड वियोगानं मला फारच दुःख होत आहे! शिव! शिव! असं म्यां पूर्वजन्मीं किंवा ह्या जन्मीं कोणतं पाप केलं होतं कीं, ज्यामुळं मला तिच्या दहा दिवसांतच हा असह्य कारागृहवास भोगावा लागत आहे! मन चिंती तें वैरीही न चिंती ! त्याप्रमाणं मला ह्या प्रसंगाचं पूर्वीच भविष्य कळून चुकलं होतं! ह्या अंधार कोठडींत सध्यां मीं ढेंकणापिसांची सोबतीण झालें; ह्मणून मला मुळींच वाईट वाटत नाहीं! परंतु ही आतां माझ्या जन्माला लागली व तीमुळं माझ्या प्रिय स्वामिणीचं दर्शन सर्वथैव दुर्लभ झालं; ह्याचं मला फारफार दुःख होत आहे! **कामकंदला** बाई! आपकी मजवर किती ममता! किती विश्वास ! पण त्याचा आज दुर्दैवानं असा कीं हो परिणाम केला ! ! आतां मी काय करूं? मला तुमचं दर्शन कधीं व कसं होईल? अरे देवा! तुला तरी कांहीं करुणा येऊं दे! परोपकार करण्यांत व स्वामिणीच्या सेवेंत हा देह झिजविण्यांत जें कांहीं पुण्य आहे तें आणखी कशांतही नाहीं! असो मीच पापी असेन, तेव्हां मला तें पुण्य तरी कसं घडावं? अधमा **कामसेना**! स्त्रीविरहानं वेडा होऊन अशी डोळे झांक करतोस ना? म्यां तुझा असा अन्याय तरी कोणता केला! तुझ्यासारखा राजा, **चंद्रचूडा**सारखा प्रधान व बृहस्पतीसारखे इतर बुधजन तुझ्या सभेंत असतांही तूं माझ्या कोटिक्रमास वश झालास; मला त्या सर्वांसमक्ष त्वां वचन देऊन **माधवास** बंधमुक्त करून माझ्या स्वाधीन केलंस; व सरशेवटीं आग्रहानं आह्मां उभयतांस एक दिवस त्वां आपल्या मंदिरांत राहूनही घेतलंस; तरी तूं मला ओळखलं नाहींस; त्याला मीं

काय करावं? मी निरपराधी असतां त्वां मला अशी जन्मठेप देणं हेंही तुला एक भूषणच ह्मणायचं! **गिरजे**! आतां गतगोष्टीचा पश्चात्ताप, भगिनीविरहाचं दुःख, ह्या दीनअवस्थेंत जीवाला होत असलेले क्लेश व रोजचे रोज माझी प्रिय स्वामीण मला आतां अंतरली! असं ह्मणत अश्रु ढाळीत बसण्यापेक्षां मुकाट्यानं हिरकणी खाऊन निजणं, हें फार चांगलं! ( हिरकणी काढून )बये! तूं मला ह्या जाचांतून लौकर मुक्त कर, कारण आतां या जगांत माझं असणं आणि नसणं सारखंच आहे!माझा मृत्यु ऐकून माझ्या स्वामिणीस व कदाचित् **माधव**रावांसही फार दुःख होईल!पण आतां काय त्याचं! हे दीनवत्सला! मी आत्महत्त्या करतें ह्मणून तूं माझा हेवा मात्र करूं नकोस! हाय! हाय!आज मी सर्व जगाला व माझ्या ह्या देहाला अंतरतें!!!

( हिरकणी खाऊन निजते. )

( पडदा पडतो. )

**अंक ३ रा समाप्त.**

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

स्थल—अवंती; राजवाड्यांतला एक महाल.

पात्रें.

**माधव**..........................................नायक.
**चंपकमालती**..........................त्याची दुसरी स्त्री.
**दुर्मुख**..........................................राजदूत.

( पुष्पशय्या घातलेल्या मंचकाजवळच **चंपकमालती** फुलांचे हार-तुरे गुंफीत बसली आहे. )

**माधव**—(येऊन, आनंदानें) पत्यनुकूला सुंदरी आपल्या प्रियकराचा शब्द फुलासारखा झेलीत असतात; तो असा! अन्योक्तिरूपानें काल मीं आपली शृंगारसंभोगेच्छा दर्शविली मात्र; तों आज ही सहजस्नेहरसाला ह्या महालांत जिकडे तिकडे थाटमाट करून व स्वतःही नटून माझ्या वाटेकडे डोळे लावून बसली आहे! ह्या गजगामिनीला म्यां कितीही मन भरून पाहिलें तरी माझ्या नेत्रांची ह्मणून कांहीं केल्या तृप्ति होतच नाहीं! क्षणोंक्षणीं जरी हिच्याकडे अवलोकन करून पाहिलें तरी ही आपलें नूतन सौंदर्य दाखवितें तें दाखवितेच! अहाहा!

श्लोक.

आनंदें सुरतांत दंग असतां घर्मांबु येती मुखीं !
येती कुंतल आननीं विखरुनी जैं श्रांत होते सखी !
प्राणेशस्वरुपीं सुदृष्टि मिनतां ज्यांनीं तिला भंगिली !
रोषें ते कच आवळून सखिनें वेणी पहा घातली ! १
भृंगांच्या बहुसाल पंक्ति लुटण्या येती मरंदाप्रती !
वाराव्या शतधा परी न कधिही त्या अंबुजा सोडिती !
तेवीं पंकजलोचने ! दृढ जरी वेणी तुवां घातली !
त्वद्दृष्टी तरि पाहिजेच सुरतीं त्या कुंतलीं भंगिली ! !२

पुष्पांचा गजरा करून सखये ! वेणीवरी घातला !
तेणें कुंतलपाश हा कुरळसा अत्यंत गे ! शोभला !
इंद्राचें रमणीय हें धनु जणों मेघावली शोभवी !
किंवा हा उदयाचलीं उडुपती वद्याष्टमी भासवी ! ३
हे डोळे असती अनंगपतिचे भाते शरांचे महा !
काळ्या सुंदर भोंवया विलसती जेवीं धनुष्यें पहा !
नेणें त्यांतुनि काढुनी शर कधीं योजीत चापावरी !
मारूनी मज नेत्रबाण सखि ही काळीज माझें हरी ! ४
चांप्याच्या कळिसारखें सरळ हें नाक प्रियेचें असे !
मोत्यांची टुमदार ज्यांत नथ ही अत्यंत शोभा वसे !
त्या बाळ्या डुलती कशा श्रवणिं ज्या वेलावली गुंफिली!
कर्णीं मंजरि लेउनी जणुं महा-श्वेता इथें बैसली ! ५
रत्नांच्यापरि दंतपंक्ति झळके ह्या कोमला आननीं !
जेव्हां सस्मित बोलते मधुर ही प्राणेश्वरा पाहुनी !
प्रेमानें जरि पाजिती अधर हे पीयूष मातें तरी !
आहे मी अझुनी अतृप्त न कळे ! कां हें मला अंतरीं !६
कंठीं लेउनि चंद्रहार धवला विस्तीर्ण मुक्तावली !
लावण्यांबुधिराजहेमकलशोत्तुंगस्तनी बैसली !
झाले उन्नत सर्वही अवयव प्राणप्रियेचे अहा !
अंगीं कंचुकि ज्यामुळें तटतटे, मध्यस्थलीं शालु हा ! ७
भाळीं कुंकुम लावुनी हळद ही पद्मानना सारखी !
तेणें दिक्गजगामिनी अरुणसा स्वप्नांत कीं भासवी !
शोभे सुंदर मेखला कटितटीं पादांगुलीं जोडवीं !
उत्तुंगस्तनयुग्म इंदुमुखिची ती कंचुकी दाटवी ! ८
उत्फुल्लांबुजनाल कोमल जसे हे हस्त होती तसे !
रंभेच्या परि ऊरु वर्तुल महा क्रीडागृहस्तंभसे !
ती नाभी कमलांतरंगपरिचें सौंदर्य जें दावितें !
त्यायोगें मज विश्व हें सकलही सौवर्णसें भासतें ! ! ! ९
वस्त्रा सांवरुनी करस्थवलयां मोदें रुणत्कारित !
डोळे मोडित नूपुरें हलुहळू पायीं झुणत्कारित !

**जेव्हां येशिल हार घेऊन मला घालावया सुंदरी !**
**शृंगारोत्सव कांन होइल अहा ! तेव्हां अशा मंदिरीं?१०**

**चंपकमालती**—(स्वगत.) ह्यांचा हा सुस्वर ऐकून तर आज मीं अगदीं तल्लीन झालें! प्राणनाथ कधीं कधीं मला थट्टेनें ह्मणतात कीं, तुझें मधुर बोलणें ऐकून लाजेनें कोकिला स्तब्ध बसतात ! पण आज माझ्या ह्या प्रियकरांची मनोवृत्ति प्रसन्न असल्यामुळें ह्यांचे हे मधुरालाफ ऐकून मीच स्तब्ध बसलें कीं काय असा भास होतो ! पतिनें स्त्रीवर व स्त्रीनें पतीवर मंजुल गाणीं रचून तीं स्वच्छंदानें तालसुरांत मधुरालाफ घेऊन एकमेकांस गाऊन दाखविणें हें एक त्यांच्या अत्यंत निर्मळ प्रेमाचें चिन्ह आहे! (पाहून) प्राणनाथ इकडच येत आहेत ! आज्ञेप्रमाणें म्यां सर्व तयारी करून ठेवलीच आहे! आतां मी बळेंच वेड पांघरून जरा गंमत करतें !

(**माधव** येतो व **चंपकमालती** लाजून दूर उभी राहाते).

**माधव**—वः ! आज थाट तर खूप केला आहे बुवा ! अस्तु; पण तूं अशी दूर कां ?

**चंमकमालती**—मी आपली दूरच बरी दिसतें !

**माधव**—एकांतांत जर इतकी लाज तर गुरुजनांसमोर तूं आपली सावलीसुद्धां मजवर पडूं देणार नाहींस !

**चंपकमालती**—( सस्मित ) सावली पडूं देण्याचे दिवस आले ह्मणजे तसेंही होईल !

**माधव**—प्रिये ! आणखी ते दिवस कसे यावेत ! सर्व ऋतूंत श्रेष्ठ जसा वसंत; तसेंच सर्व वयांत श्रेष्ठ काय तें तारुण्य ! आणि ह्या तारुण्यांत तूं प्रतिनवमल्लिकालता बनून पुष्पवती झाल्यानें अत्यंत सुंदर दिसत आहेस ! परंतु त्या पुष्पांतून मकरंद गळतांना जशा त्यावर भ्रमरांच्या उड्यावर उड्या पडतात, तद्वत् तुझे हे मदन–चेष्टांनीं पूर्ण असे सुंदर विलास पाहून माझें मन तर अतिशय तल्लीन झालें आहे ! मग सखे ! ह्या देहाम्रतरूस तुला त्या नवमल्लिकालतेप्रमाणें प्रेमानें गाढालिंगन देण्याचे दिवस नाहीं कां आले ?

**चंपकमालती**—( खालीं मान घालून कांहींच बोलत नाहीं ).

**माधव**—( तिच्याजवळ जाऊन ) असो, पहिल्यानें आह्मांला एकदां साखरेचा द्या न् मग आपण मानिनी स्त्रियांच्या वर्गांत बसा! आतांच एक जासूद येऊन गेला! **विक्रमानें** मला कांहीं कामाकरितां अवश्य ये ह्मणून निरोप पाठविला आहे!

**चंपकमालती**—असं तें अवश्य काम कोणतं आहे कोणास्कळे? आतां कां आपण असल्या कामोत्सवाचा विरस करून **विक्रमाकडे** जाणार?

**माधव**—काय करावें? गेलें पाहिजे! तूं इतकी निराश नको होऊं! मी आलोंच ह्मण! मग रात्र आहे व आपण आहों!!

**चंपकमालती**—पण खरोखरी लौकर परता अं! न आलां तर माझ्या गळ्याचीच—

**माधव**—वेडीच आहेस तूं! उठतां बसतां कसली शपथ घेऊन बसतेस?

**चंपकमालती**—मग—जातां तर येवढा विडा तरी घेऊन जा! ( विडा देते )

**माधव**—( तिचा पदर धरून ) पण त्यावर विद्रुमोष्टांचा पेढा?

**चंमकमालती**—( मुरका मारून मागें सरते ) जा मेलं! मी नाहीं बाई! हें काय गडे आपलं भलतंच!

**माधव**—( बळेंच तिची हनुवटी धरून )

श्लोक.

**भिऊं नको अशी लोकसुंदरी!**
**कुणिहि ह्या नसे साच मंदिरीं!**
**जवळ ये गडे! चित्तरंजने!**
**अमृतसार दे गोड चुंबने! १**

( तिचें चुंबन घेऊं लागतो तों **दुर्मुख** येऊन. )

**दुर्मुख**—महाराज! मघांपासून **विक्रमराज** आपली एकसारखी वाट पाहात बसले आहेत! आपण लौकर चला!

**माधव**—कां रे दुर्मुखा! आज इतकी बोलावण्यावर बोलावणीं कां बरें येतात?

**दुर्मुख**—देवनगरीस **कामकंदला** नांवाची कोणी वेश्या आहे तिनें आपणाकडे एक जासूद पाठविला आहे. त्याला महाराजांनीं आपल्याच वाड्यांत ठेवून घेतला आहे!

**माधव**—( आनंदानें ) चल तर! हा पहा मीहि तुझ्या बरोबरच आलों! ( जातात. )

**चंपकमालती**—( आपणाशीं ) **कामकंदलेकडून** जासूद आला आहे त्या अर्थी तिच्याविषयीं शेंकडों प्रश्न त्या जासुदास पुसण्यांतच ही रात्र उलटणार हें माझं मलाच दिसतं! शिव! शिव! लग्न झाल्यापासनं एक दिवससुद्धां मी प्रियांशीं मन भरून बोललें नाहीं! आज तसा योग आला होता व मीहि—

## श्लोक.

**अंगी चंदन चर्चुनी मृदुलशा माळा गळां घालुनी**
**भाळीं केशर लावुनी तव मुखीं तांबूल हा देउनी**
**त्वत्कंठीं मिठि मारुनी प्रियकरा! मोदें त्वदंकावरी**
**होतें मी बसणार कीं स्मितमुखें घेऊन पंखा करीं! १**
**कांहीं कालवरीं परस्पर करूं शृंगार नानापरी!**
**प्रेमानें गुजगोष्टि सांगत बसूं ही यामिनी जोंवरीं**
**देऊनी मज थाप; काल मग कां टाकूनही सुंदरी**
**गेलासी सवतीकडे जिवलगा! तूं आज तन्मंदिरीं! २**

ह्यावरून, **कामकंदले**! तुझ्याविषयीं माझ्या मनांतली पूज्यबुद्धि कमी झाली नाहीं, हें मात्र लक्षांत ठेव! कारण तूं काय व मी काय! विरहोत्कंठितांचा, त्यांच्या प्रियकरांनीं ऐन सुखाचे वेळेस, असा मानभंग केला म्हणजे त्यांच्या तोंडांतून असले उद्गार निघायचेच! मेल्या हृदया! आतां अशी तळमळ करून काय उपयोग! तुझ्याच्यानं त्या वेळेस जरा धीर धरवता तर अमृताहूनही जें मधुर, त्या चुंबनसुखाचा मला लाभ घडला नसता?

## पद.

( चाल—शशिकुलभूषण गुणवंता! या चा० )

**हळहळ करशिल किति हृदया। नेलें त्वां सुख तें विलया?॥ध्रु०॥**

'माझ्या उच्छंगीं बैस;' वदतां, पति तूं भ्यालेंस !
देतां ! तांबुल मी त्यांस; सस्मित मुख न तूं केलेंस !
धरितां, अवळुनि ममतनुस; भिउनि तूं मार्गे सरलेंस !

( चाल—ब० )

उत्कंठेनें चुंबन घ्याया, धरितां अधरा या;
परि तूं धजलेंस; चुकवाया ! ॥ १ ॥ हळहळ० ॥

अरतु, कोणतीही गोष्ट सगळे योग जमून आल्याशिवाय होत नसते ! पण बाई ! आज माझा उजवा डोळा कां वरं लवतो ? देवनगरीहून त्या दुर्मुखानं कोणती बातमी आणली आहे कोण जाणं ! आपणच जाऊन तिचा आतां तपास काढावा, हे बरं ! ( जाते. )

---

## प्रवेश २ रा.

### स्थल—अरण्य.

### पात्रें.

विक्रम.............................अवंतिनाथ.
शृंगारवल्लरी.........................माधवाची स्त्री.
राक्षस.............................पूर्वजन्मीचा मदांध.

( प्रज्वालित झालेल्या अग्निकुंडास **विक्रम** प्रदक्षिणा घालीत आहे. )

**विक्रम**—( थांबून ) आणखी एक प्रदक्षिणा घातल्यावर हा देह अग्न्यर्पण होणार ! ( साश्रु. ) माझें शरीर ह्या कुंडांत भस्म झाल्यावर माझ्या पश्चात् माझ्या अति विस्तीर्ण राज्याचें काय होणार ? आपल्यावर मनापासून प्रेम करणाऱ्या प्रियकरणीच्या दुःसह विरहानें मूर्छित पडलेल्या त्या बिचाऱ्या **माधवास** सावध करून त्याचे हेतु कोण पुरविणार ? माझी प्रिया माझी कुठवर मार्गप्रतिक्षा करणार ? मन्मरणानंतर त्या बिचारीची पुढें काय अवस्था होणार ? माझी प्रजा, माझे मित्र व माझे सेवकवृंद मला कुठकुठें शोधणार ? व मी त्यांस कोठें सांपडणार ? जीकापार यत्न केले तरी ती अमृतसंजीवनी मला नाहींच कां लाधणार ? दैवा ! तूंही ह्या परोपकारासाठीं मरणाऱ्या **विक्रमराजाला**

कितपत छळणार ? हेंच तें अरण्य ! तें पहा; तें देवसरोवरही तेंच व हेंच त्या सोमवल्लीचें स्थान ! पण, फक्त त्याच वल्लीचा जेव्हां थांग मला लागत नाहीं तेव्हां मी निराश होऊन दीन मुखानें **कामकंदले**च्या विरहानलानें भाजलेल्या **माधवाचें** जें प्रेत पाहावें व त्या दीन **चंपकमालती**चे पाषाणांसही द्रव आणणारे दीर्घ विलाप ऐकावे; त्यापेक्षां मीं जें सध्यां धाडस करीत आहें; तें योग्य नव्हे काय ? मला ह्या आत्महत्येचा दोष लागेल; येवढेंच ना ? सुखेनैव लागो ! परंतु ह्या प्रतिज्ञाभंगक **विक्रमाचें** कलेवर आतां ह्या धरणीमातेस व्यर्थ भारभूत न होवो! वाहवारे प्रीति ! त्या स्त्रीपुरुषांच्या नखशिखांत खिळलेली आहे ! **सुषेण** माझा पूर्ण विश्वासुक सेवक आहे ! तेव्हां ह्या अकस्मात् प्रीत्युत्क्रमणानें ती थोर मनाची **कामकंदला** दीर्घ मूर्च्छना येऊन धाडकन् पडली असेल; यांत नवल तें कोणतें ? तसाच तो **माधव** ! **दुर्मुखानें** त्यास **कामकंदले**ची लटकी मरणवार्ता कळवितांच त्या बिचाऱ्यानें अत्यंत शोक करून धरणीतलावर आपला देह टाकला तो टाकलाच ! माझ्या धन्वंतरीनेंही पुष्कळ उपाय केले ! पण ते सारे व्यर्थ झाले ! नाडीपरीक्षेवरून त्याचा आत्मा कुडी सोडून गेला नाहीं व तो ह्या अरण्यांत असलेल्या सोमवल्लीस्पर्शानें पहिल्यासारखा सावध होईल; येवढें मात्र त्यानें खात्रीपूर्वक सांगितलें ! आतां ती वल्ली मी कोठें पाहूं ? कोणा अधमानें तें संजीवनीवन विध्वंसून टाकलें असावें ? ( पडद्यांत गलबला होतो ) अरे ! माझा शोध करीत कोणी तरी आलें वाटतें ! त्यांना आतां हें तोंड दाखवून काय उपयोग ? देवा ! मला तूं सायुज्यसदनास ने; हेंच ह्या **विक्रमाचें** आतां शेवटलें मागणें आहे ! ( पडद्यांत आणखी गलबला होतो ). छेः आतां त्वरा केलीच पाहिजे ! माझ्या मागें त्या राज्याचें, माझ्या प्रियेचें व एकंदर जगाचें कांहींहि होवो ! आज माझा अवतार समाप्त झाला ! अग्निनारायणा ! हें हृदय वज्रासारखें कठिण करून मी तुला शेवटली प्रदक्षिणा घालतों ! ( तसें करतो ). चल ! घे हा पापात्मा आपल्या उदरांत ! (उडी टाकूं लागतो तोंच **शृंगारवल्लरी** धांवत धांवत येऊन **विक्रमाच्या** कंबरेस मिठी मारते व तिच्या मागें लागलेला एक राक्षस येतो ).

**शृंगारवल्लरी**—हे उदार पुरुषा ! जरा दम धर ! ह्या चांडाळा-

पासून ह्या अनाथ कन्येची सुटका कर ! व तदनंतर तूं ह्या प्रज्वलित झालेल्या अग्निकुंडांत उडी टाक ! ( राक्षसाकडे पाहून किंकाळी फोडते) आईग ! आई ! ! आला मेला ! महाराज ! रक्षण करा ! रक्षण करा !

**राक्षस**—( क्रोधानें ) निर्लज्जे ! गे ! कठोर हृदये ! तूं स्वर्गी जा! पाताळीं जा ! हवी तेथें जा ! तुला ह्मणून आज मी सोडणार नाहीं ! एक, तुझें रक्त प्राशन करीन; नाहीं तर तुझ्यावर बलात्कार करून मी आपला कामाग्नि शांत करीन ! ( तिला धरूं लागतो ).

**विक्रम**—राक्षसा ! तूं इतका मदोन्मत्त होऊं नकोस ! मी जवळ असल्यावर हिच्या अंगास स्पर्श करण्याची तुझी छाती नव्हे ! कामानें बेफाम होऊन स्त्रियांचें पातिव्रत्य भंग करणें हें आयुर्वृद्धीचें लक्षण नव्हे !

**राक्षस**—प्रसंगच तसा आला आहे तेव्हां कोणाचें आयुष्य संपलें आहे व कोण ह्या सुंदरीचें हरण करतो; हें आतांच समजेल ! ही भयानें अत्यंत कांपत आहे; ह्मणून हिच्यासमोर मला तुझ्याशीं युद्ध करवत नाहीं ! ह्यासाठीं एकीकडे चल व तेथें तूं आपला प्राण सुखेनैव धोक्यांत घाल ! तुलासुद्धां या स्त्रीच्या व्यामोहापासून कांहीं सुख होणार नाहीं !

**विक्रम**—( संतापानें ) अधमा ! असे शब्द उच्चारतां उच्चारतां तुझी जिव्हा झडून पडो ! ( **शृंगारवल्लरीस** ) स्त्रिये, तूं अगदीं घाबरूं नकोस ! ह्या नीच राक्षसाचा निःपात करून तुला तुझ्या इच्छित स्थळीं पोंचतें करीन, आणि मग मी ह्या देहाचें ह्या अग्नीकडून निर्दालन करवीन ! येवढा ह्या **विक्रमाच्या** वचनावर तुझा पूर्ण भरंवसा असूं दे !

**राक्षस**—( मनांत ) काय ? हा **विक्रम** ? **विक्रम** हीं अक्षरें कानीं पडतांच माझी अशी चमत्कारिक स्थिति कां बरें झाली ?

**शृंगारवल्लरी**—राजा ! ईश्वर तुझें कल्याण करो ! व तो तुला मार्कंडेयाचें आयुष्य घालो !

**विक्रम**—( राक्षसास. ) मदांधा ! मदानें अंध होऊन व्यर्थ तूं आपल्या जिवास मुकूं नकोस !

**राक्षस**—वायफळ बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं ! व तुझें माझें द्वंद्व झाल्याखेरीज ह्या सुंदरीला गत्यंतर नाहीं.

**विक्रम**—ठीक आहे ! तुझी इच्छा असेल तेथें द्वंद्व खेळण्यास च-ल ! व आणखीही कोणी तुझा साह्यकर्ता असल्यास त्याला तूं घेऊन ये!

( जातात. )

**शृंगारवल्लरी**—आतां माझ्या जीवांत जीव आला ! माझा प्राण-नाथ ह्याच राजाच्या आश्रयानं राहिला आहे; असं ती **चंपकमालती** बोलत होती ! तें जर खरं असलं तर देवानंच माझं गाऱ्हाणं ऐक-ल्यासारखं झालं ! ती **चंपकमालती** सध्यां **अवंतीस** असेल कीं रा-नांतच माझ्यासाठीं भटक्या मारीत अजूनही हिंडत असेल; हें कांहींच सांगवत नाहीं ! असो; त्या मेल्या **राक्षसास** निर्दाळून राजा परत-ला ह्मणजे त्यालाच विचारीन. देवा ! जसं त्या **राक्षसानं** मला छ-ळलं व माझे नाहीं नाहीं ते हाल केले; तसं जो कोणी माझं वैर क-रीत असेल; त्याचेही न होवोत !

[ पडद्यांत ]

" अधमा ! मृत्तिकेचा घट उचलून जसा धरणीवर आपटून त्या-चे तुकडे तुकडे करावे तशीच आतां मी तुझी अवस्था करतों ! "

( मोठ्यानें अवाज होतो. )

**शृंगारवल्लरी**—[चपापून.] हा शब्द त्या राजाचाच असावा. त्या चांडाळ राक्षसाचा नव्हे ! त्याचा असता तर माझ्या कानटाळ्याच बस-त्या ! देवा! ह्या राजाचं तूं सर्वतोपरी कल्याण कर! बिचारा मोठा दया-ळू असून परोपकारी दिसतो ! पण तो आपल्या सुंदर शरीराची ह्या अ-ग्निकुंडास आहुति कां देत आहे कोण जाणे! त्याचं कारण समजल्या-खेरीज माझ्या मनांतला खुटका जायचा नाहीं!

(**राक्षसा**च्या रक्तानें भरलेला **विक्रम** येतो.)

**शृंगारवल्लरी**—(त्याच्या पायां पडून. ) महाराज! आपण मजवर आज जे उपकार केले आहेत ते माझ्याच्यानं फिटणं मुळींच संभवत नाहीं! फार तर काय? ह्या देहचर्माचा जोडा करून जरी महाराजांच्या पायांत घातला तरी मी आपली ऋणीच राहीन!

**विक्रम**—(तिला उठवून) सुशीले! त्यांत उपकार ते कसले? अना-थांला संकटांतून मुक्त करणें हा आम्हां क्षत्रियांचा धर्मच होय! तें असो.

पण तूं कोण? कोठची? जात होतीस कोठें? व ह्या चांडाळाच्या हातांत सांपडलीस कशी?

**शृंगारवल्लरी**—महाराज! मी तें आपणांस सर्व कांहीं सांगेन; पण त्यापूर्वीं माझ्या मनांत जो एक संशय आला आहे, तो महाराजांनीं मजवर कृपा करून आधीं घालविला पाहिजे!

**विक्रम**—(दुःखानें) सुंदरी! दुर्दैवाचे खेळ मी कोठपर्यंत सांगत बसूं? कधीं कधीं मनुष्य करायला जातें एक व होतें भलतेंच!! त्याप्रमाणें मी एका **माधव**नामक द्विजपुत्राचें प्रीतिपरीक्षण करायला गेलों तों तो बिचारा दीर्घमूर्च्छना येऊन निचेष्टित पडला तो पडलाच! माझ्याच कृतीनें तो सुंदर पुरुष ह्या भूतलास सोडून गेला! त्याच्या प्रीतीचा विषय **देवनगरींतली कामकंदला**नामक एक वेश्या होय! (साश्रु.) त्या ब्रह्महत्येच्या पातकापासून मुक्त होण्याकरितांच तुला तुझ्या गांवीं पोंचवून आलों ह्मणजे मी ह्या अग्निकुंडांत उडी टाकीन!

**शृंगारवल्लरी**—(रडत) देवा! रे! देवा! अजूनही मला दुःखाचे डोंगर कितीसे ओलांडून जावे लागणार आहे; न कळे!

**श्लोक.**

**कां नाहीं मज राक्षसें अवचितें त्या रे ईश्वरा! भक्षिलें?**<br>
**वैधव्यस्थिति भोगण्यास कशि मी अद्यापिही वांचलें?**<br>
**सौख्याचा जगतांत अंश लव ह्या कांहींच कां हो नसे!**<br>
**नेणें त्या विधिनेंच काय लिहिलें माझ्या कपाळीं असें!१**

(कपाळावर हात मारून) देवा! शेवटीं तूं प्राणनाथाची भेट नाहींच ना होऊं दिलीस?

(मोह पावते.)

**विक्रम**—(आपणांशीं) काय? हीही त्या **माधवा**चीच स्त्री आहे काय? शिव! शिव! हिला दुःखांतून मुक्त करावें ह्मणून मीं त्या राक्षसाचा प्राण घेतला! पण त्याही दुःखापेक्षां हिला हिच्या पतीचें मरण सांगून जास्त दुःख देण्यास शेवटीं मीच ना कारण झालों? सर्वच गोष्टी मला प्रतिकूळ कशा होत चालल्या?

(तिला सावध करतो.)

**शृंगारवल्लरी**—महाराज ! त्याच देवनगरीची **चंपकमालती** आपणांस माहित आहे काय ?

**विक्रम**—तिचा त्या **माधवाशीं** विवाह होऊन बरेच दिवस झाले !

**शृंगारवल्लरी**—तिच्यावरही वैधव्य दुःखाची अकस्मात् वीज कडकडून पडली ना ?

**विक्रम**—काय करूं ? येथें कोठेंशी एक सोमवल्ली नामक वनस्पति होती; ती शोधतां शोधतां मी अगदीं थकलों ! परंतु माझें दुर्दैंव सांप्रत जेथें तेथें मला आड येऊन तिला माझ्या दृष्टीस पडूं देत नाहीं ! ती सांपडेल तर मी ब्रह्महत्येपासून खास मुक्त होईन !

**शृंगारवल्लरी**—ह्मणजे माझे प्राणनाथ उठतील; हेंच ना ?

**विक्रम**—( आशेनें ) होय ! होय ! तिच्यायोगानें मी त्यास खास उठवीन ! तुला ती ओळखतां येते काय ?

**शृंगारवल्लरी**—तो चांडाळ राक्षस जेव्हां माझे हाल हाल करी; तेव्हां मी वारंवार बेशुद्ध होऊन पडें ! पण त्या मेल्यानें एक वनस्पति आणून तिचा रस माझ्या घशांत ओतावा ह्मणजे म्यां पुन्हां सावध व्हावें! त्यानें ती कुठं ठेवली आहे हें जरी मला माहीत नाहीं; तरी पण मी सांगतें त्या ठिकाणीं आपण शोधाल तर देवाच्या दयेनें आपणांस यश येईल.

**विक्रम**—तूं मला ब्रह्महत्येंतून मुक्त करतोस हे माझ्यावर तुझे अनंत उपकार होत ! आतां होईल तितकी त्वरा केली पाहिजे. चल आपण ती शोधावयास जाऊं !

**शृंगारवल्लरी**—( चालतांना साश्रु ) देवा ! आतां तरी माझी तुला करुणा येऊं दे रे ! !

( जातात. )

पडदा पडतो.

---

## प्रवेश १ रा.

### स्थल--देवनगरी; नाट्यशाला.

### पात्रें.

कामसेन.................................राजा.
चंद्रचूड.................................त्याचा प्रधान.
सूत्रधार.................................एक नाट्याचार्य.
नटी.................................त्याची स्त्री.
मदांध.................................एक ऋषी.
पुष्पधन्वा.................................त्याचा मुलगा.
कमललोचना.................................त्याची स्त्री.

( इतर सेवक; प्रेक्षकगण इ०.)

( प्रेक्षकांची बरीच दाटी झाल्यानंतर **कामसेन** व **चंद्रचूड** येतात. )

**कामसेन**—( चहूंकडे पाहून ) मंत्रिराज ! आजची प्रेक्षकजनांची दाटी, व नाटकवाल्यांनीं ह्या रंगभूमीवर केलेला अद्वितीय थाट पाहून मला खरोखर आनंद होत आहे ! अर्धचंद्राकार उंच ओटा घालून त्यावर बहुमोलाचीं चित्रविचित्र वस्त्रें पसरलीं आहेत ! ह्या उंच ओट्याच्या किनाऱ्या वरचा विद्युद्दीपांसही लाजविणारा तेजस्वी प्रकाश माझे तर नेत्रच दिपवीत आहे! व हा प्रकाश पाहून मला तर असें वाटतें कीं, ह्या रंगदेवतेनें दीपकरत्नांचा आपल्या गळ्यांत हारच करून घातला आहे ! सर्वांच्या अग्रभागीं असणाऱ्या त्या सुंदर पडद्याच्या दाहों बाजूंस जे स्तंभासारखे दोन पडदे लावले आहेत ते किती तरी चांगले आहेत ? त्यांवरील चित्रें काढणाराची धन्य असो ! काढलीं आहेत चित्रें सुरूच्या झाडाचींच ! पण त्या खऱ्या झाडांत व ह्यांत फरक काडीभरसुद्धां दिसत नाहीं ! तो पडदा तरी किती भव्य दिसत आहे ? त्या पडद्यावर काढलेलें चित्र आपल्या ह्या नाट्यशाळेचेंच प्रतिबिंब होय ! जों जों प्रेक्षकांची दाटी, जों जों ह्या दीपकांचा प्रकाश व जों जों ह्या नाट्यशाळेचा थाट वाढत जाईल तों तों रंगदेवतेला अधिकाधिक स्फुरण येत येईल ! ( चंद्रचूडास ) मंत्रिराज ! आज नाटक कोणतें आहे ? व तें करविण्याचा आपला उद्देश कोणता बरें ?

**चंद्रचूड**—महाराज! आजचें नाटक 'कमललोचनासतिगमन' आहे! आणि तें करविण्याचा माझा उद्देश फक्त अशानें तरी आपणांस आपल्या दुःखाचा विसर पडून घटकाभर आपलें मनरंजन व्हावें! एवढाच आहे!

**कामसेन**—(स्वगत.) भडकलेल्या अग्नीस शीतलोदकाचे थोडेसे बिंदू कसे बरें शमवूं शकतील? (उघड) खरोखर! आज काल नाट्य-प्रयोगासारखें मनरंजन करणार दुसरें प्रधान साधन मुळींच नाहीं!

(पडद्यांत)

**दिंडी.**

**सरसभारति सुंदरी! कोमलांगे!**
**तुझ्या चरणां त्वद्दास आज लागे!**
**प्रबंधातें पाहून ह्या कवीच्या**
**तंद्रि लागो मानसीं प्रेक्षकांच्या!**

**चंद्रचूड**—महाराज! हें मंगलाचरण झालें! नाटकास आरंभ झाला! इतक्याचें इतक्यांतच हे प्रेक्षकजन पहा, चित्रासारखे कसे स्तब्ध झाले आहेत!

**(सूत्रधार व नटी प्रवेश करतात.)**

**सूत्रधार**—प्रिये! आपण आणखीं येवढें मंगल करूं म्हणजे झालें!

**दिंडी.**

**कांतविरहें आक्रोश क[illegible]**
**धरणिं लोळे "हे नाथ!" वदूनीयां!**
**मळात तेणें स्तन [illegible]**
**तुम्हां सुखकर हो [illegible]**

**नटी**—प्राणनाथ! पुढील प्रसंगा[illegible] चांगलें केलें.

**सूत्रधार**—प्रिये! आतां विलंब [illegible] ध्या वृत्ति तल्लीन कर! तोंपर्यंत (जातो.)

**नटी**—( गाते. )

**श्लोक.**

**कमललोचना शोभनानना !**
**ऋषिवरांस जों देत दर्शना !**
**मदनबाण तों त्यांस ताडिती !**
**जपतपादि तें नाश पावती! १ ॥**

( पडद्यांत. )

" शाबास! सुंदरी शाबास! फारच यथायोग्य त्वां भाषण केलेंस ! "

**नटी**—( पाहून. ) हा ऋषिकुमार फारच संतापून माझा उपरोध करीत इकडेच येत आहे! मला बाई याचें भय वाटतें ! ( जाते. )

**पुष्पधन्वा**—( संतप्त येऊन ) काय हो या मदनाचा प्रभाव तरी! एकदां स्वारीनें शरीरांत प्रवेश केला म्हणजे मग तो देव असो, ऋषि असो, कोणीही असो ; स्त्रीसाठीं वेडा झालाच ! तो ज्ञानी असला तर अज्ञानी होतो ! शहाणा असला तर मूर्ख होतो! सुष्ट असला तर दुष्ट होतो! थोर असला तर हलकट होतो! सलज्ज असला तर निर्लज्ज होतो! सारांश, मन्मथक्रीडेंत त्याला पशूप्रमाणें आपपर भेद मुळींच नाहींसा होतो! विश्वामित्रानें सईच्या अग्रावर तपश्चर्या केली; पण तिची माती झाली ! ब्रम्हदेवानें **सरस्वती** निर्माण केली. पण त्यानें सर्व वेदांस एकीकड गुंडाळून ठेवून तिचाच उपभोग घेण्याकरितां तिचा पाठलाग केला! तों त्याला योग्य प्रायश्चित्तहा मिळालें! रावणानें वेदांचीं चौदा खंडें केलीं; पण सीतेपायीं अपार संतति-व-संपत्तिसह तो मातीस मिळाला! **कौरवेश्वर दुर्योधन** व **वीराटसेनाधीश कीचक** त्यांचीही पण तीच अवस्था! इतके ही भयंकर परिणाम त्या अधमास, म्हणजे प्रत्यक्ष माझ्या तातास, समजत असूनही जेव्हां त्यास अशी दुर्बुद्धि झाली ; तेव्हां काय म्हणावें ? आणि ती दुर्बुद्धि कोणाविषयीं ? तर प्रत्यक्ष माझ्या प्रियेविषयीं ! ! देवा ! स्नुषा आणि श्वशुर यांच्यांमध्यें जेव्हां आतांपासूनच असा नीच प्रकार उद्भवला, तेव्हां पुढें कलीचा पूर्ण अमल बसल्यावर ह्या धरणीतलावर अत्यंत अधमतेचे किती प्रकार घडतील ? हाय! हाय! नीचा मदांधा! तूं मोठा तपस्वी ! तुझी सेवा करणें हा आम्हां स्त्रीपुरुषांचा धर्म, आणि त्या धर्माचें त्या बिचारीस, म्हणजे रे नृपशो! तुझ्याच

सुषेस असलें फळ देतोस ना? दुष्टा! तुला तुझ्या ह्या नीच आचरणानें कोणतें फळ मिळेल तें मिळो! व ह्यापासून तुला कोणतें सौख्य लाधेल तें लाधो! (पडद्यांत.) ' प्राणनाथ! अहो प्राणनाथ! धांवा हो धांवा! आणि ह्या नीच व जरठ बुद्धि थेड्याच्या हातांतून मला सोडवा हो सोडवा! अहो! माझें पातिव्रत्यभंग होण्याची वेळ आली! ईश्वरा! तूं तरी धांवून द्रौपदीसारखें या अनाथ कन्येचें रक्षण कर.

**पुष्पधन्वा**—(क्रोधानें) प्रिये! भिऊं नकोस! हा मी आलों! त्या अधमास मी आतां शापून **राक्षस** करतों! (जातो.)

**कामसेन**—काय हो चमत्कार! आजपर्यंत मी स्त्रियांना फारच नीच समजत असें! पण, ह्या मन्मथपीडीत ऋषिवर्यांची स्थिति पाहून तर मला तोंडांत बोट घालावें लागत आहे! स्त्रिया अज्ञानी; म्हणून त्यांना पति आणि जार ह्यांत फारसा भेद वाटत नसेल असें मी समजत होतों! पण पुरुष, आणि त्यांतूनही हे पुण्यवान् ऋषिवर्य, ज्ञानी असून जेव्हां ते असा अनाचार करण्यास प्रवृत्त झाले, तेव्हां त्या अज्ञान स्त्रियांनीं काय करावें?

**चंद्रचूड**—बरोबर आहे! एकदां सर्व इंद्रियांवर मनोनिग्रहाचा दाब बसला व प्रत्येक पुरुषानें स्वतःचें आचरण अत्यंत शुद्ध ठेवलें, व त्याचेंच अनुकरण करविण्याचा स्वस्त्रीकडून परिपाठ घातला तर असल्या नीच प्रकारांचें व त्या बिचाऱ्या मदनाचें तरी तेथें काय चालणार व कसला अनाचार होणार?

(**कमललोचनेचा** पाठलाग करीत **मदांध** नांवाचा राक्षस येतो.)

**कमललोचना**—(साश्रु.) प्राणनाथ! सरतेशेवटीं आपण मला टाकून गेलांतना? आतां माझें रक्षण कोण करील? माझी सौभाग्यनौका ह्या दुष्टानें वैधव्यसागरांत कशी बुडविली? प्राणनाथ! मीच आपल्या आधीं कां मेलें नाहीं? देवा, पतीच्या असह्य दुःखानलानें मी भाजत आहे! पण माझा देह जळून त्याचें भस्म होत नाहीं, तेव्हां मला आणखीं दुःखें भोगावीं लागणार असें दिसतें! तथापि, माझी सर्व लाज तुला! त्वां आजपर्यंत भक्तांच्या संकटकाळीं अनेक रूपें धरून दुष्टांचा निःपात केलास तसा ह्याचा कर! व प्राणनाथांसह मला आतां सती जाऊं दे! हाय! हाय! माझ्या डोळ्यासमोर प्राणनाथांचे नाहीं नाहीं ते

हाल करून ह्या **कामांध** वज्रहृदयानें त्यांचा प्राण घेतला! हे **अहिल्या, तारा, द्रौपदी, सीता, मंदोदरी** आदि साध्वी स्त्रियानो! माझ्या पातिव्रत्याचें रक्षण करा! आकाशा! तूं तरी कडकडून माझ्यावर पड! म्हणजे तुझ्याखालीं माझा चुराडा होईल! अथवा धरणीमात! तूं आतां दुभंग हो! व तुझ्या उदरांत मला जागा दे! हाय! हाय! अजूनही माझें रक्षण करण्यास कोणीही धाऊन येत नाहीं! अगे **मुर्च्छे**! अगा **मृत्यो**! तुम्ही तरी ह्या विकलजनांवितेचा अंगीकार करा! देवा! माझी ही स्थिति पाहून वृक्षपाषाणही धाय धाय रडायला लागले तरी तुला ह्या अनाथ कन्येची कांहींच करुणा येत नाहींना?

**राक्षस**—सुंदरी! हे मनमोहने! गे तनुमध्यमे! तूं असा शोक करूं नकोस! मला ऋषीची काया असतां तुझ्या नवऱ्यानें असा उःशाप दिला आहे कीं, "**मदांधा**! एका ब्राम्हणाचें जीवितसंरक्षण करण्याकरितां देवसरोवराजवळ **सोमवल्ली** शोधण्यासाठीं राजा **विक्रमाची** स्वारी येईल! तुझें व त्याचें ह्याच स्त्रीसाठीं कारण निमित्तें मोठें द्वंद होऊन तूं त्याचे हातून मेलास म्हणजे तूं उद्धरून पूर्वपदास पावशील!" अभिरामे! जरी मी सध्यां राक्षस आहें तरी माझ्या कुडींत आत्मा तोच आहे! तूं जर माझे मनोरथ येथें पूर्ण करूं देशील तर मी हा माझा शाप संपल्यावर स्वप्रभावानें तुझ्या नवऱ्यास जीवंत करीन व तुला त्याच्या स्वाधीन करीन! ह्यासाठीं हे गजगामिनी! तूं माझें ऐक! आपण विवाहित स्त्री पुरुषांच्या नात्यानें ह्या वनांत आनंदानें कालक्रमणा करूं! अगे! कंबुकंठी! अशी दुःखीकष्टी होऊन विनाकारण ह्या जाईच्या फुलासारख्या कोमल देहास क्लेश देऊं नको!

**कामसेन**—शिव! शिव! ही एकटी अबला अशा प्रसंगीं ह्या मदोन्मत्त राक्षसापुढें काय करणार? बिचारी दीनमुखानें चहूंकडे पाहत क्षणोक्षणीं अश्रू ढाळीत आहे! प्राणप्रियेच्या उरांत म्यां खंजीर खुपसल्यावर तिची जी दीनावस्था माझ्या दृष्टीस पडली होती; तीहूनही हिची ही दीनावस्था सध्यां मी पहात आहें! व आंतले आंत दुःखानें हृदय कालवून प्राणप्रियेच्या वधाचा पश्चात्ताप त्यास हळहळ करायला लावीत आहे!

**राक्षस**—काय गे! मंजुभाषिणी! अशी स्तब्ध कां? बोलत कां नाहींस?

**कमललोचना**—( हात जोडून. ) मामंजी ! आतां मी आपलीच आहें! पण आपण ती **सोमवल्ली** शोधून आणा व मला द्या! ह्मणजे मी जर कदाचित् भीतीनें मेलें तर आपणांस मला जीवंत करतां येईल! पण ती वल्ली आणल्याखेरीज जर आपण मला त्रास द्याल तर मी अग्नींत उडी टाकून हें शरीर भस्म करून घेईन! तुमची शपथ! मी कुठें जायची नाहीं! व आपण आल्याखेरीज मी येथून हालायची नाहीं! जा तर जा व येवढें काम करून या !

**कामसेन**—ह्याला दूर घालविण्याची हिनें चांगली युक्ति काढली ही ! पण पुढें आतां ही काय करणार ?

**राक्षस**—ओ होः ! हें काम मी मोठ्या आनंदानें करून येतों! पण पहिल्यानें एकदां अमृतासारखा गोड—

**कमललोचना**—( तिरस्कारानें ) तें कांहीं नाहीं !

**राक्षस**—अस्तु. तुझी मर्जी! तुझ्या कलाकलानेंच तुझा उपभोग घेतला पाहिजे! ( जातो. )

**कमललोचना**—( रडत. )

**दिंडी.**

**शोधितें मी जाऊन शव पतीचें**
**क्षणिक घेतें परिरंभ-सौख्य याचें !**
**वनीं यत्नें तो अग्नि चेतवून !**
**सती जातें मी निश्चयें करून !**

( जाते. )

**कामसेन**—मंत्रिराज! पुढचा तो सती जाण्याचा देखावा पाहण्यास मी अगदीं असमर्थ आहें! माझें हृदय शोकानें भडभडून आलें! याकरितां सूत्रधारास ह्मणावें कीं, आतां पडदा पाडा !

**चंद्रचूड**—माझीही आपणासारखीच अवस्था झाली आहे! तो पहा! **सूत्रधारच** पडद्याबाहेर आला आहे!

**सूत्रधार**—( हात जोडून ) महाराज! आपलें घटकाभर रंजन करण्याचा आह्मीं यत्न केला व तो चांगल्या तऱ्हेनें शेवटास गेला हें सर्वांच्या मुखश्रीवरूनच व्यक्त होत आहे! प्रेक्षकहो, **कमललोचना** सती

गेली व राक्षस वनांत हिंडूं लागला, येथेंच आमची गोष्ट संपली. दोषांचा परित्याग करून गुणलवांचा स्वीकार करावा; अशी आपणांस प्रार्थना आहे!

**कामसेन**—खरोखर, ह्या एकांकी गोष्टीनें आपण आमचें चांगलें मनरंजन केलें!

**सूत्रधार**—( नम्रतेनें ) येथेंच माझ्या श्रमाचें साफल्य झालें.

( प्रणाम करून जातो. )

**कामसेन**—( चंद्रचूडास ) आतां रात्रही बरीच झाली असेल? चला तर!

**चंद्रचूड**—चला!

( जातात. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ४ था.

### स्थल—देवनगरी; राजमंदिर.

**पात्रें.**

**कामसेन**..........................................राजा.

**चंद्रचूड**.......................... ............ .प्रधान.

**चंद्रचूड**—(स्वगत.) शाबास माझ्या त्या गुप्तहेरांची! **चंपकमालतीचा** शोध लावून ते **उज्जनीहून** परतले; तेव्हांच माझा जीव खालीं पडला! ती आतां आनंदानें आपल्या पतीसह कालक्रमणा करते हें तिचें सद्भाग्यच होय! **विक्रमानें वार्ताहराबरोबर** हें पत्र पाठविलें आहे तें मी आतां महाराजांस वाचून दाखविणार! बहुधां ह्या पत्रावर त्यांचें माझें ह्मणणें एकच पडेल असा अजमास दिसतो! किती तरी ह्या पत्रांतला मजकूर भयंकर आहे बरें? स्तब्धता धरून **विक्रमराजा**चें ह्मणणें मान्य करावें तर **देवनगरी**च्या राजास निर्बलत्वाचा दुस्सह कलंक लागतो! व आमच्या महाराजांस लग्नाच्या चांगल्या महिषी असून ते वेश्यासक्त आहेत असा त्यांचा दुस्तर दुर्लौकिक पसरण्याची भीति आहे! बरें; ह्या पत्राला

'तुमचे आमचे धारातीर्थींच बळी पडूं द्या' असें उत्तर द्यावें तर महा-
राजांची सांप्रत स्थिति ह्मणजे **रतिप्रिये**च्या विरहानें फारच भयंकर झाली
आहे ! राज्यविषयक गोष्टींतून त्यांनीं आपलें मनच काढून घेतलें आहे !
रात्रंदिवस त्या **रतिप्रिये**करितां पश्चात्ताप करून शोक करतात !
क्षणोक्षणीं वेड्यासारखें करून स्वतःचीच स्वमुखानें निंदा करून घेतात !
तेव्हां म्यां तरी आतां काय करावें ? ( इकडे तिकडे हिंडून ) हेच ते
महाराज ! स्त्रीविरहानें संतापक्वथित होऊन मीं ह्मटल्याप्रमाणेंच करीत
आहेत ! जवळ जाऊन त्यांना मी आतां हें **विक्रमा**कडून आलेलें पत्र
दाखवितों !

( दुःखानें उदास झालेला **कामसेन** येतो व **चंद्रचूड** त्याच्या
जवळच उभा राहतो )

**कामसेन**—(स्वगत)**चंद्रचूडानें** तें नाटक करविल्यापासून तर **रति-
प्रिया** माझ्या डोळ्यासमोर दिसते! लोक ह्मणतात कीं,प्राण गेला ह्मणजे
सर्व कांहीं आटपलें ! त्या प्राण्याला अग्नीस अर्पण करून त्याचीं हाडें
व राख नदींत टाकली ह्मणजे मग जगाच्या सहस्त्रवेळा जरी घडामोडी
झाल्या तरी त्या बापड्याच्या कचाग्राचेंही दर्शन होणें संभवत नाहीं !
असें जर आहे, तर ह्या अधमानें, ह्या वज्रहृदयानें, ह्या भीमकर्म्यानें
जिच्या उरांत, मनांत विलक्षण शंका उत्पन्न होऊन, **खंजीर** खुपसला !
जिला **वरुणावती**च्या नदीवर चंदनाच्या लांकडांची चिता रचून अग्नीस
अर्पण केलें ! जिची राख व हाडें म्यां स्वतः त्याच नदींत फेंकून दिलीं!
जिची हत्या दूर होण्याकरितां म्यां शेंकडों प्रायश्चित्तें घेतलीं ! तरी ती
माझी प्राणप्रिया, कधीं क्रोधानें आपले कमलाकार दिव्य नेत्र लाल
करून मला रागें भरणारी, कधीं तें शिरीषकुसुमासारखें कोमलतर
हृदय माझ्या पुढें उघडें करून ती **खंजीरानें** झालेली जबर जखम व
त्यांतून भळभळ वाहणारें रक्त दाखविणारी, कधीं रोगानें अत्यंत पीडित
होऊन पांढरी फट्ट झालेली, कधीं माझ्या पहिल्या प्रेमाची व संतापानें
म्यां केलेल्या माझ्या नीच कृतीची दीन मुखानें निंदा करीत असलेली,
व कधीं तर 'मी स्त्रीहत्या बनून तुझ्या मागें तुझा प्राण हरण करण्या-
साठींच आतां हात धुऊन लागलें आहे,' असें कर्कश रवांनीं ह्मणत अस-
लेली ती **रतिप्रिया**च मला आतां कां बरें दिसावी ?-हाय ! हाय ! प्रिये!

( साश्रु ) अविचारास, व त्या दुष्ट क्रोधास वश होऊन म्यां तुझा विनाकारण प्राण घेतला ! तूं अत्यंत साधीभोळी होतीस ! म्यां तुला नुसता **खंजीर** दाखवितांच जेव्हां तूं आपला अपराध आपण होऊन कबूल केलास, तेव्हां अर्थातच पुढें माझ्या बोधवचनांनीं तुझ्या हृदयांत प्रकाश पाडून त्यांनीं तुला त्या पापांतून मुक्त केलें असतें ! व खुशाल आपण पूर्वीप्रमाणें आनंदानें नांदलों असतों ! तुला त्या **माधवावर** अनुरक्त होण्याची बुद्धि सुचली; हें तुझें दुर्दैव तर खरेंच ! पण त्याचा, तुझ्या प्राणांताचा, व सांप्रत माझ्या असह्य दुःखाचा मूळ पाया ती **कामकंदला** होय ! अधमे ! एक स्त्रीहत्या झाली तशी दुसरीही झाली तरी हरकत नाहीं; पण तुझे मी लौकरच तुकडे तुकडे करणार; हें लक्ष्यांत ठेव.

**चंद्रचूड**—( एकीकडे ) असें तर खरेंच ! ती जर नसती तर माझी कन्या अल्पवयांतच आपल्या साहस कृतीनें मला कालिमा न आणती ! पण आतां काय उपाय ? त्या कालिमेपासून मुक्त होण्याचा यत्न करणें ह्मणजे आपल्या शरीराचा धारातीर्थीं बळि देणें होय ?

**कामसेन**—( उसासा टाकीत ) हाय ! हाय ! कांहींही असो ! पण प्रिये ! सध्यां तूं तर मला अंतरलीस ! ( साश्रु ).

**दिंड्या.**

कशी मजला विपरीत बुद्धि झाली ?
प्राणसखिची मज नाहिं दया आली ?
'नको!' म्हणतां ती दीन आननानें
हाय! वधिलें तिस म्यांच निर्दयानें! १
निर्दया रे ! त्वां काय असें केलें ?
विश्वसौंदर्यालागिं लया नेलें !
कसें मजला प्रतिकूल दैव झालें ?
अग्नि म्हणुनी सद्रत्न म्यां त्यजीलें ! २
लया गेलें रमणीयपण जगाचें !
उदधि गेले आटून नवरसांचे !
नसे उरलें माधुर्य गे कशांत !
तुझा होतां मत्प्राणसखे! अंत ! ३

अभाग्याच्या गृहिं कामधेनु आली!
खड्ग घेउन परि म्यांच विदारीली!
क्रूरकर्मा मी जाहलों अभागी
निंद्य झालों मी सर्व जगालागीं! ४

करीं घेउन खंजीर मी शुभांगे!
तुझ्या सन्मुख जधिं ठाकलों उभा गे!
खोंचितां तो तव हृदयिं हाय! हाय!
तुला सखये! वाटलें तधीं काय! ५

बघुन मजला सुंदरी! त्वां हंसावें!
उठुन दचकूनी जवळ तुवां यावें!
स्तनांवरचा त्वां पदर सांवरूनी
चित्त वेधावें मंजु भाषणांनीं! ६

झुरति पाहुनि मृगशावकें जयांला!
त्याच नेत्रीं पाहून ह्या जनाला!
गाढ द्यावें परिरंभ मला तूंच!
म्यांहि घ्यावें तुज अंकिं गे! तसेंच! ७

सुखें दुर्मिळ जीं होतिं सुरेंद्राला!
प्रिये! दिधलीं त्वां तींहि ह्या जनाला!
परी आतां तीं सर्व लया गेलीं!
चपल चपला अदृश्य जणों झालीं! ८

सुगंधानें भाळून तो भुजंग!
केतकीचें कवळीत मृदू अंग!
तसें सुंदर पाहून त्वद्विलास!
घट्ट कवळावें म्यां तुझ्या तनूस! ९

भुजंगाहुन कर नीच सखे! माझे!
हाय! धजले त्वत्प्राण हराया जे!
भुवनपाला! हा दुष्ट ह्या जगांत
नको ठेवूं धरणीस भारभूत! १०

( रडतो. )

**चंद्रचूड**—मी जर असाच येथें स्तब्ध उभा राहिलों तर महाराज आणखी शोक करून कदाचित् मोह पावतील आणि **विक्रमाकडून** आलेल्या **वार्ताहरास** विलंब लागेल ! ( **कामसेनापुढें** जाऊन हात जोडून उघडपणें ) महाराज ! काय हें ? आपल्या दुःखाचें पाऊल जरा मागें पडावें म्हणून मी तें आपणांस नाटक दाखविलें ! परंतु त्याचा कांहीं एक उपयोग न होतां उलट त्यापासून आपणांस संताप मात्र उत्पन्न व्हावा, ही मोठ्या खेदाची गोष्ट होय ! असो. झालेल्या गोष्टीस उपाय नाहीं, असें मानून महाराजांनीं जरा विवेक करावा व ह्या **चंद्रचूडाच्या** विनंतिकडे जरा लक्ष्य पुरवावें !

**कामसेन**—आपण सांगतां तें सर्व खरें ! पण काय करूं ? ती स्त्रीहत्या ह्या पापात्म्यास चैन पडूं देत नाहीं !

**श्लोक.**

**सतत दिसते ती हो ! माझ्या पहा ! नयनांपुढें !**
**हृदय बनुनी दग्धप्राय प्रियाविरहें कढें !**
**चरचर चिरी हा ! हा ! माझ्या जरी हृदयाप्रती**
**अमित तुकडे त्याचे कैसे करीत न हाय ! ती !**

**चंद्रचूड**—महाराजांनीं हा विषयच आतां सोडून द्यावा ! त्यानें आपणांस सुख होईल ! व चित्तास जरा स्वास्थ्य वाटेल !

**कामसेन**—तसेंच करतों ! काय आहे आपलें म्हणणें ?

**चंद्रचूड**—**विक्रमाकडून वार्ताहर** नामें एक दूत पत्र घेऊन आला आहे ! त्यांतला मजकूर भयंकर व चमत्कारिक आहे !

**कामसेन**—ह्मणजे ?

**चंद्रचूड**—हें पत्र वाचलें ह्मणजे आपणांस कळेल !

**कामसेन**—वाचा पाहूं !

**चंद्रचूड**—( पत्र वाचतो. )

॥ श्री ॥

" स्वस्तिश्री. सर्वगुणसंपन्न **कामसेन** मांडालिक राजे यांस राजाधि-
" राज मालवेंद्र **विक्रमार्क** राजे यांजकडून—

" प्रतिवर्षाप्रमाणें आपणांकडून दोन वर्षांची खंडणी आम्हांस
" अद्याप मिळाली नाहीं; ह्याचें कारण राज्यप्रकरणीं आपलें दुर्लक्ष्य
" आहेसें वाटतें. दुसरें; आपले शहरांत '**कामकंदला**' नामें एक
" अत्युत्तम गाणारी वेश्या आहे, तीही आपण खंडणीबरोबरच पा-
" ठवून देणें. आपण वर लिहिलेल्या गोष्टी कबूल केल्यास बरें;
" नाहीं तर युद्धास सिद्ध व्हावें. पाठविलेल्या मनुष्याबरोबर उत्तर
" आलें पाहिजे; ही विनंति. "

**विक्रम** आणि त्याचे मंत्री.

**कामसेन**—तो ब्राह्मणाचा पोरगा **विक्रमा**ची कास धरून राहिला आहेसें वाटतें ! येरवीं **विक्रमाचें कामकंदलेशीं** काय प्रयोजन असणार? **विक्रमा**चें ह्मणणें मान्य करून जर आपण खंडणी व **कामकंदला उज्जनीस** पाठविली तर तो नीच **माधव** मला काय म्हणेल? (त्वेषानें) मंत्रिराज ! ह्या रांडेकरतां व त्या अधम द्विजपुत्राकरतां युद्धास सिद्ध व्हावें; हेंच मला उचित दिसतें ! !

**चंद्रचूड**—आपण आतां घटकाभर एकांतीं जाऊन ह्या गोष्टीचा विचार करीत बसूं ! व उभयतांच्या अनुमतानें ठरेल त्याप्रमाणें ह्या पत्राचें उत्तर पाठवूं !

**कामसेन**—चला तर.

(जातात)

(पडदा पडतो.)

**अंक ४ था समाप्त.**

---

# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

**स्थल—अवंति ; राजवाडा.**

**पात्रें.**

**विक्रम**..........................................राजा.
**विदूषक**..........................................त्याचा मित्र.

( **विक्रम** येतो. )

**विक्रम**—( आपणाशीं ) कोण त्या **कामसेना**चा उरमटपणा हा ! **वार्ताहरा**बरोबर पाठविलेल्या पत्राचा त्यानें व **चंद्रचूडानें** असा जबाब द्यावा काय? माझी शक्ति, माझें सैन्य, माझा पराक्रम, माझें साहस, माझें धैर्य, माझें शौर्य त्या उभयतांस माहित असून त्यांनीं जेव्हां माझी त्या यःकश्चित् वेश्या व द्विजपुत्राकरितांच अशी संभावना केली; तेव्हां त्यांस काय ह्मणावें? तुझे हेतु मी पूर्ण करीन, असें मी ज्याला वचन दिलें, ज्याच्या प्रीतिपरीक्षणांत मला अपयश लाधून मी अग्निकाष्ठ भक्षण करणार, तोंच ज्याच्या प्रिय स्त्रीची त्या राक्षसापासून मुक्तता करून त्या बिचारीनें मला ज्याच्या हत्येंतून मुक्त केलें, जो गायनकलेचा प्रियसखा, विद्येचा लाल व सुंदरतेचा उल्हास ; त्याच **माधवास** जर मी त्या वेश्यासक्त **कामसेना**च्या स्वाधीन केलें, तर माझ्या सर्व कष्टांवर पाणी पडून मी कृतघ्न होणार नाहीं काय? सहस्त्रार्जुन **परशुरामास** जसा शत्रु मानीत असे, तद्वत् तो **कामसेन**ही जेव्हां माझ्या आश्रयानें बिचाऱ्या **कामकंदले**च्या आशेनें बोटांवर दिवस मोजीत असणाऱ्या **माधवास** शत्रुसारखा पाण्यांत पाहतो तेव्हां तो त्याच्या हस्तगत झाल्यावर त्याचें जिवंत राहणें मुळींच संभवत नाहीं ! केवळ त्या वेश्येकरतांच **कामसेन** आपल्या राज्याची धूळधाण करीत आहे हें त्या बुद्धिमान् **चंद्रचूडास** तरी कसें आवडतें? अथवा त्यांत त्याचा तरी

काय दोष आहे? प्रभूच्या आज्ञेनें त्यासही वागलेंच पाहिजे! त्या **सर्वांस अंतकराजाचींच** निमंत्रणें आलीं असल्यास तेथें कोणाचा उपाय आहे? असो. माझ्या आज्ञेप्रमाणें सेनापतीनें सर्व कांहीं तयारी केली आहेच! उद्यां प्रातःकाळीं येथून कूच करावें ह्मणजे दोन तीन दिवसांत त्या '**धारातीर्थ**' नामक रणभूमीला जाऊन पोहचूं! **कामकं-दला** हस्तगत करून ती **माधवास** दिली ह्मणजे झालें! मग **कामसे-नाचा** पराभव झाला तरी मी त्याला पूर्वीप्रमाणेंच सादरसत्कारानें **देवनगरीचें** राज्य अर्पण करीन! त्याचा मी विनाकारण वध करणार नाहीं! जातांना **माधवास** व त्याच्या स्त्रियांस बरोबर घेऊन गेलें पाहिजे! व त्यांबरोबर माझें मनोरंजन करणारा माझा मित्रही पण आला पाहिजे! (पाहून) बिचाऱ्यास शंभर वर्षे पूर्ण आयुष्य आहे! नांव घेतांच स्वारी तयार! ह्मातार्‍या माणसांप्रमाणें डावा हात कंबरेवर ठेवून, उजव्या हातानें काठी टेकीत टेकीत माझा मित्र इकडेच येत आहे!

**विदूषक**—(येऊन) ह्या भुकेल्या ब्राह्मणास **माधव** व त्याच्या स्त्रिया यांजकरवीं मिष्टान्नभोजन घालविणाऱ्या माझ्या मित्राचा जय असो!

**विक्रम**—ये मित्रा या सिंहासनावर बैस!

**विदूषक**—छिः छिः श्राद्धाच्या पिंडाप्रमाणें आह्मीं आपले दर्भावर-च चांगले शोभतों! (आसनावर बसतो.)

**विक्रम**—आज **माधवा**कडे तुझी तर खूब चंगळ उडाली असेल; नाहीं बरें?

**विदूषक**—हें काय विचारणें? वायनावर वायनें पटकावून पंच-पक्वान्नाच्या राशी ह्या उदरेश्वरांत आकंठ साठविल्या आहेत! तरी तुझी मर्जी असल्यास तुझ्याही पंक्तीचा लाभ घेण्यास हें मेहूण तयार आहे!

**विक्रम**—**माधवा**कडे आज आपलें मेहूण गेलें होतें तर?

**विदूषक**—तें कांहीं पुसूं नको! आज जी कांहीं गम्मत झाली ती या जिवाजीपंतालाच ठाऊक!

**विक्रम**—बरें पण तिचें थोडेंसें वर्णन तर कर!

**विदूषक**—निश्चयाप्रमाणें हा **रतिमदनाचा** जोडा **माधवाच्या** घरीं जाऊन थडकतांच **शृंगारवल्लरी** व **चंपकमालती** ह्यांनीं आमची वटसावित्रीप्रमाणें यथासांग पूजा करून आह्मांस पुष्कळ प्रकारचीं सौभाग्यदायक वाणें दिलीं ! जिवापाड कष्ट करून जर त्याप्रमाणें मनुष्याचे मनोरथ सफळ झाले तर त्याचा देवब्राह्मणांच्या ठिकाणीं विश्वास बसतो व तोही झालेले कष्ट विसरून आनंदीत असतो !

**विक्रम**—बरें मग ?

**विदूषक**—वाद्योपचार झाल्यावर भोजनार्थ आह्माला त्या दोघींनीं आंत नेलें ! तो तेथला थाट काय विचारता ? चोहोंकडे रांगोळ्या दाट घालून त्यांच्या मध्यभागीं आह्मांसाठीं दोन पाट नवरानवरीसारखेच मांडले होते ! त्यांपुढें पंचपक्वान्नांनीं भरलेलें ताट वाढून तयारच होतें ! मग काय ? यजमानांची आज्ञा होतांच घे गोड घांस कीं, टाक तोंडांत ! व आम्ही चटण्याकोशिंबिरी, भाज्या किंवा मीठ तर, इतरे जना ! ! ! असा सपाटा लावला ! मेलेल्या कुत्र्यासारखीं जेव्हां आमचीं खाऊन खाऊन पोटें फुगलीं तेव्हां मोठ्या कष्टानें आह्मीं पात्रांवरून उठलों !

**विक्रम**—अरे ! तुझें भोजन तर दुपारींच झालें असेल ! मग हा काळपर्यंत तेथें तूं काय करीत होतास ?

**विदूषक**—मित्रा ! तें कांहीं विचारूं नकोस ! आज आमची फजिती झाली !

**विक्रम**—ती कशी काय बुवा ?

**विदूषक**—भोजनोत्तर वामकुक्षी झाल्यावर मी उठून पाहतों तों **शृंगारवल्लरी**, चंपकमालती आणि आमची **चंढिका**– ( लाजल्यासारखे करतो ).

**विक्रम**—अरे ! **चंडिका** ह्मणून तिकडे तोंड कां केलें ?

**विदूषक**—अरे ! न कळत म्यां आपल्या बायकोचें नांव घतलें !

**विक्रम**—अरे घेतलें तर घेतलें ! त्यांत काय मोठेंसें? बरें पण मग पुढें?

**विदूषक**—त्या तिघी हिंदोळ्यावर बसून गाणीं ह्मणत आहेत ! व

त आहे.

विक्रम—तुझ्या चंडिकेचा आवाजही मोठा मधुर असेल ?

विदूषक—मधुर ह्मणजे किती पण ? तिचा आवाज ऐकून घर-कांत ऊंस घातला ह्मणजे तो सुद्धां हळूंच ओरडतो !

विक्रम—पण त्यांचीं तीं गाणीं माधवावरतींच केलेलीं असतील?

विदूषक—असें तर खरें !

विक्रम—मग तुझी चंडिका काय करीत होती ?

विदूषक—वः ! तिनें सुद्धां त्याच वेळेस माझ्यावर एक गाणें रचून त्यांना ह्मणून दाखविलें !

विक्रम—तें गाणें तुला येतच असेल ?

विदूषक—यांत काय संशय ? तुझ्या सभेंत जीं नऊ रत्नें आहेत तसलेंच हें एक दहावें आहे ! मग मला एकपाठी शक्ति नसेल काय ?

विक्रम—मग तर काय ? सोन्याहून पिंवळें ! ह्मण तर तें गाणें एकदां व कर माझे कान पवित्र पाहूं !

विदूषक—नाचत ह्मणूं कां बसूनच ह्मणूं ?

विक्रम—नाचत ह्मण !

विदूषक—( नाचत ).

गाणें.

( चाल—सा बाई सूं । बेलाच्या झाडाखालीं० )

कांत माझा कांत । आहे बाई केवळ माकडाची जात ? ॥<br>
गोड चिजा ज्यांत । असतिल तेथें जाऊनी हा मारी बाई हात॥<br>
रागाच्या भरांत । ह्याचे गालगुच्चे घेतें देतें कंबरेंत लात ! ॥<br>
गालीं रोऊन दांत । यष्टि घेऊन भरकन पळे बाई!माझा कांत!॥

विक्रम—( हंसत ). त्या चंडिकेनें तुझें वर्णन खरोखर फार चांगलें केलें ! रागानें ती तुझ्या कंबरेंत लात मारते तरी पण तूं तिचा मुका घेतल्याखेरीज राहत नाहींस !

विदूषक—छे ! विष्णवेनमः !

विक्रम—बरें मग ?

विदूपक—मग काय ? उष्ट्या हातानें कावळा मारला ह्मणजे जसा तो काव कांव करून उडून जातो तसा मीही तिच्यावर, तिनें माझी अशी फजिती केली ह्मणून, रागावून ढुंगण हालवीत हालवीत चाललों ! तों ती फुट्टाणी—ह्मणजे समजलास कां,कोण ती ? ती चंपकमालती-दारांत येऊन मला आडवून उभी राहिली.

विक्रम—तें कां ?

विदूपक—आम्ही आपल्या प्राणवल्लभेचें उखाणा घालून नांव घ्यावें ह्मणून.

विक्रम—मग त्वां कोणता उखाणा घालून तिचें नांव घेतलेंस ?

विदूपक— उखाणा, आणि तिचं नांव,— छे ! ग बाई ! मला मेली लाज वाटते ! ( मुरका मारतो . )

विक्रम—असं ग काय मेलं ? घे एकदा नांव व हो मोकळी बाई !

विदूपक—' टोला देतां नाकावर, जी गुरगुर करी पुष्कळ ! चं-डिका ती अस्वल आतां फार झाली बाष्कळ !'

विक्रम—मग तिनें तुला कोणता उखाणा घातला ?

विदूपक—अरे ! कसला उखाणा न् कसलें काय ! तिला बाष्कळ ह्मणतांच तिनें एक एक डोळा खोबऱ्याच्या वाटीएवढा करून रागारागा-नेंच माझ्याकडे पाहून म्हटलें:—

' डोळे आंत ! बाहेर दांत ! कान लांब एक हात !
' वृद्ध रेड्या ! विदूषका ! आणखी देईन कंबरेंत लात ! '

असें ह्मणतांच माझी धोतर भरायची वेळ आली ! मग तेथून म्यां ला-गलाच पळ काढला; तरी पण एक वेळ थांबून मागें पाहून तिला म्यां आ-णखी एक उखाणा घातलाच.

विक्रम—कोणता तो ?

विदूपक—' चिंचेचा आकडा , सदां जसा वांकडा
' तसा तुझ्या माझ्यामध्यें छत्तीसाचा आकडा !

विक्रम—असे तर खरें ! पण पुढें ती उगीच राहिली कां ?

**विदूषक**—ती आपल्या रागांतच चूर होती ! पण त्या **चंपकमालती**च्यानें कांहीं उगीच राहवलें नाहीं ! ती ह्मणाली:—'उठतां लात कमरेंत, बसतां बुक्की पाठींत ! ' मिळते तरी **चंडिके**च्या, तुम्ही आह्मां मुठींत ! ' आणि मित्रा हेंही खरेंच ! ! !

**विक्रम**—भोजनाच्या वेळेसच काय तें तुम्हा नवराबायकोचें जमतें ! नाहीं तर येरव्हीं तुमच्यामधून कधींही विस्तव जायचा नाहीं !

**विदूषक**—ह्या श्रेष्ठ जनाचा त्या सटवीनें असा अपमान केल्यामुळें आमच्या तब्यतीची घाण झाली! असें पाहून ती फुट्टाणी पुन्हां आली! व तिनें मजजवळ क्षमा मागून माझा राग शांत केला ! अतएव तिनें गोड गोड बोलून पुन्हां रंगपंचमी केली ! जसें **शृंगारवल्लरी** व **चंपकमालतीनें** केशरी रंगाच्या पिचकाऱ्यांवर पिचकाऱ्या मारून **माधवास** त्राही त्राही केलें तसें **चंडिकेनें**हीं मला पिचकाऱ्या मारमारूं सळो कीं पळो केलें ! सर्वांनीं गुलालाच्या व अर्गजांच्या मुठीवर मुठी भरून मला खडूकुत्र्याचा माकडच बनविलें! व तोंडांत गोड ह्मणून साखरफुटाणे कोंबून मला तुझ्याकडे पाठविलें ! मित्रा ! ही आमची प्रतिष्ठा पाहण्याकरतां स्त्रियांचा समुदाय हळूंहळूं बराच जमला होता!

**विक्रम**—ह्मणूनच तूं आज लालीलाल झालास ! बरें पण सध्य **माधव** काय करीत आहे ?

**विदूषक**—जसा एखादा पांगळा दोन्ही बगलेंत दोन कुबड्यां घेऊन चालतो तसा तो **माधव** आपल्या दोन्ही स्त्रियांच्या गळ्यांत हात घालून प्रेमानें गुलगुल गोष्टी सांगत इकडून तिकडे तुझ्या त्या बालसुमन बागेंत फिरत आहे ! आमची धांगड आमच्यावर रागावली नसती तर आह्मीही नसतों कां तिला बगलेंत मारून त्याच बागेंत हिंडलों ?

**विक्रम**—मित्रा ! तुझा विनोद आतां पुरे ! उद्यां तूं मात्र पाठीशीं शिदोरी बांधून तयार ऐस !

**विदूषक**—शिकार असली तर आमचें कांहीं येणें होणार नाहीं ! आजपर्यंत झालें तें झालें !

विक्रम—छे: ! छे: ! आतां शिकारीचें तूं नांवच सोड ! आपलें सैन्य उद्यां धारातीर्थी जाऊन पोंचलें कीं, दोन तीन दिवसांनीं वीराच्या गर्जनेनें व धुळीच्या लोटांनीं दशदिशा कोंदून सागरास भेटण्याकरितां शोणिताच्या सरिता वाहूं लागतील !

विदूषक—( भिऊन ) अँ ? क—क—काय ह्मणतोस ! मी—मी—न—न—नाहीं ये-ये—

विक्रम—(हंसत.) अरे मी जवळ असूनही येथेंच इतका घाबरतोस?

विदूषक—( कंबर बांधीत ) हा पराक्रमी पु—पु—पुरुष घ—घ—घाबरणारा कां अ—अ—आहे ? प—प—पण-( पडूं लागतो. )

विक्रम—( त्यास सांवरीत. ) वः ! आपण तर शूरत्वाची येथेंच कमाल केलीत !

विदूषक—( किंचित् धैर्यानें ) मित्रा ! घाबरण्याचें तूं नांवच सोड ! लढाई ह्मणतांच मला इतका कांहीं त्वेष आला कीं, घे यष्टी नू फोड लाडू ! ( काठी उगारतो )

विक्रम—( त्याचा हात धरून. ) हं ! हं ! हं ! बालशौर्य माझ्या बोडक्यात एखादी !

विदूषक—मित्रा ! मी लढाईला येतों ! पण कोणाचा मुर्दा पडला तर मी उचलायचा नाहीं अतएव मी मुर्देफरास बनणार नाहीं ! कोणाला मंत्राग्नि द्यावयाचा नाहीं ! फारच त्वां आग्रह केलास तर कदाचित् बाराव्या तेराव्याचा विचार करीन ;

विक्रम—तूं ह्मणशील तें कबूल ! पण तुला माझ्या बरोबर आलेंच पाहिजे !

विदूषक—येतों ! पण आणखी एकदां तुला ह्मणतों ? जर तिच्या दुदैवानें आस्मादिकाचें डोकें अकस्मात कोणी उडविलें तर तेच वेळीं दुसऱ्या माणसाचें, घोड्याचें, गाढवाचें, माकडाचें; वेळेस सपाड्यांत सांपडेल त्याचें डोकें तोडून माझ्या धडावर बसीव व मला पुन्हां जिवंत कर ! पण तूं असा लढणार तरी कोणाशीं ?

विक्रम—त्या कामसेनाशीं !

**विदूषक**—अः ! मग कांहीं हरकत नाहीं ! त्या बेण्याची हाबेलंडी उडवून देईन !

**विक्रम**—तर मग मी पुढच्या तयारीस लागतों ! पण पहिल्यानें त्या माधवास उभ्यां उभ्यां इकडे पाठवून दे !

**विदूषक**—ठीक आहे ! ( जातात. )

---

## प्रवेश २ रा.

### स्थल—कामकंदलेचा महाल.

**पात्रें**

**माधव**............................................नायक.
**कामकंदला**......................................नायिका.
**कामसेन**..........................................राजा.

**जयसिंग, दयालसिंग** वगैरे हत्यारबंद शिपायी.

**माधव**—(येऊन.) **धारातीर्थाहून** येथपर्यंत माझ्या बरोबर आलेला तो **दयालसिंग** आतांचे आतांच कोणीकडे गुप्त झाला कोण जाणे ! असो. त्याच्याशीं आपलें आतां कांहीं एक कर्तव्य उरलें नाहीं ! त्यानें मला ह्या महालाजवळ आणून सोडलें, हेच त्याचे मजवर उपकार झाले समजायचे ! ह्या वेळेस भगवान् **चंद्रमा** आकाशाच्या मध्यभागीं असल्यानें चहूंकडें सामसूम झालेली वाटते ! जणों काय ही रजनियुवति आपल्या **चंद्र-कांतास** पाहून सलज्ज होत्साती लाजून दूर उभी राहिली आहे ! सर्व प्राणी गाढ निद्रेंत मग्न असतील; पण ती बिचारी **कामकंदला** मरणापेक्षांही दुर्धर अशी माझी चिंता करीत स्वस्थ पडली असेल ! स्वस्थ पडणें तरी कशाचें ! पाण्यावांचून जशी मासोळी तरफड करते तद्वत् ती माझ्या विरहानें तरमळ करीत असेल! तिच्या मनांत अनेक प्रकारचे कल्पना-तरंग उठत असतील ! क्षणांत ती भावी सुखाचा मानसिक अनुभव घेऊन सानंद होत असेल व क्षणांत, त्या अधम **कामसेनाची** छळणूक व त्याचा पुढील भयंकर उद्देश मनांत आ-

णून दुःखानें अत्यंत व्याकूळ होत असेल ! मी आतां आंत गेलों ह्मणजे प्रथमतः तिची भीति घालवीन ! धैर्याच्या गोष्टी सांगून सांप्रत होत असलेल्या रणकंदनांत **कामसेना**चाच सर्वस्वी मोड होत आहे; हेंही मी तिला कळवून तिला प्रसन्न करीन! उजाडायच्या आंत **कामकंदले**ची व **चंपकमालती**ची गांठ घालून दिली ह्मणजे **चंद्रचुडा**करतां खिन्न झालेल्या आमच्या **मालती**ची ती समजूत घालील ! क्षत्रियांत रणभूमींत बाप मुलावर, मुलगा आईवर, व आई नवऱ्यावर सुद्धां शस्त्र धरते! मग **चंद्रचुडा**करतां पुढील भविष्य मनांत आणून इतका शोक तिनें कां करावा हें मलाहि समजत नाहीं! ती आपला गळा मोकळा करून रडती तरी तें पुरवतें! पण आंतले आंत तिचा जो शोकाग्नि सध्यां भडकत आहे तो चांगला नाहीं ! **कामकंदले**चें मृदु भाषण तिला मानवेल व ती मग शोकाचा त्याग करून आनंदी होईल ! असो. मी आतां आंत गेलों ह्मणजे **कामकंदले**लाही फार सुख होईल! ती माझा योग्य सत्कार करून, लाजत लाजत पदर सांवरीत येऊन मजजवळ बसेल व लडिवाळपणें मला असें विचारील कीं, " आजपर्यंत गेलेल्या हजारों वियोग घटिका माझ्याशिवाय तुह्मी कशा काढल्या ? " मी तिला मग सर्व कांहीं सांगेन ! आम्हां उभयतांना भगवान् कामदेव एकांतीं पाहतांच दोघांच्याही शरीरांत प्रवेश करील ! मग मी तिला जवळ घेईन ! सज्जनांचे गुण इतरांनीं वाखाणले ह्मणजे त्यांना जसा आनंद होतो तद्वत् ती जरी प्रथमतः मला आपल्या अंगाला हात लावूं न देतां मागें सरेल तरी मी तिला बळेंच धरून, तिचा मुखचंद्रमा पाहतांच त्या उत्तुंगपीनस्तन—रूपी चक्रवाक पक्ष्यांचें युग्म उडून जाऊं नये ह्मणून त्याला आवळून धरीन ! तिच्या सुंदर कपोलांचें, स्पर्शाच्या अभिनव सुखानें मिटलेल्या नयनांचें व त्या **चंद्रखंड**लासारख्या कपाळाचें पुनः पुनः चुंबन घेऊन कामानें दग्ध केलेल्या आत्म्यास जिवंत करीन ! कामदेवाच्या पीडेपासून तिची मुक्तता करण्यासाठीं नाभीकमलाच्या मधुर परिमलानें लुब्ध झालेली भ्रमरीच काय? अशा त्या नीविला हात घालतांच ती आपलें अंग चोरून माझ्या हातची निसटेल ! तरी—

**श्लोक.**

**प्रेमानें मग मी प्रियेस धरुनी आणीन शय्येवरीं !**

सेवोनी अधरामृतास तिजला घेईन अंकावरीं !
साडी आंसडुनी तिला निजवितां झांकील नेत्रार्ध ती !
मत्कंठीं मिठि मारितांच दृढ ती, भोगीन मी तीप्रती ! !

काय चमत्कार पहा ! ह्या काल्पनीक शृंगाररसाच्या सरितेंत मी पोंहत असतां तिच्या ओघानें मी थेट प्रिया **कामकंदले**च्याच महालांत तिच्या मंचकाजवळ वहात आलों ! ( पाहून ) होय ! हाच तो महाल ! हाच तो मंचक ! व हीच माझी प्रिया **कामकंदला** ! ( जवळ जाऊन लक्ष देऊन पहातो. )

( महालाचा देखावा. वर्णनाप्रमाणें जिचीं वस्त्रें रक्तानें भरलीं आहेत अशी **कामकंदला** मंचकावर पडली आहे व त्या मंचकाआड हातांत तरवार घेऊन **कामसेन** लपून उभा आहे. )

**कामसेन**—( स्वगत. ) शाबास ! **दयाळसिंगा** ! शाबास ! द्रव्य घेतल्याप्रमाणें माझ्याकडे त्वां शिकार तर पाठवून दिलीस! **चंद्रचूड** आहे तोंपर्यंत मला सांप्रत होत असलेल्या दारूण संग्रामाची मुळींच काळजी नाहीं ! **जयसिंग** आणि **दयालसिंग** सांगितल्याप्रमाणें येथेंच कोठें आंत बाहेर माझ्यासारखे लपून बसले असतील ! ह्या वेश्यासक्ताची मार्गप्रतिक्षा पाहत होतों ह्मणून म्यां **कामकंदले**चे तुकडे तुकडे केले नाहींत ! तरी म्यां तिला तरवारीचे वार करकरूं अर्ध मेली केलीच आहे! आतां हिच्या समक्ष ह्या विषयांधाची ही मी फारच भयंकर स्थिति करतों. आज ह्या मूर्खाचें आयुष्य संपलें ! तो **पुष्पधन्वा** आचरणानें व तपानें जितका थोर; तितकाच हा चांडाल **पुष्पधन्वा**, कृतीनें व विषयानें नीच ! स्वारी मनोराज्यांत गुंग होऊन आपल्या प्रियेकडे लक्ष देऊन पाहत आहे ! व मी ह्या अधमाच्या इतका जवळ असूनही ह्याला ह्या महालांत कोणीच दिसत नाहीं. ! ! काळ आला म्हणजे भुजंगाच्या डोक्यावर पाय पडायचाच ! ! !

**माधव**—ही मनोरमा गाढ निद्रेंत मग्न झाली ह्मणावी तर फारच श्रमल्यासारखी दिसते ! वारंवार श्वास सोडीत झोंपेंतच 'आईग !' असें ह्मणते ! सरोवरांत जाऊन हत्तीनें जशी कमलिनी तुडवावी तशी त्या अधम **कामसेनानें** हिला नुकतीच तुडविली आहेसें दिसतें ! ( त्वेषानें ) अधमा ! रे निर्दया ! रे काळसर्पा !—

**कामकंदला**—( दचकून ) कोण तें !

**माधव**— आपलाच दास आहे बाईसाहेब ! **दयाळसिंगा**बरोबर " आपण मला एक दोन दिवसांत घेऊन न जाल तर **कामसेन** माझें डोकें खास उडवील " अशा अर्थाचें तूं ज्याला पत्र पाठविलेंस तो तुझा प्रियकर **माधव**, **धारातीर्था**हून प्रहर रात्रीच्या सुमारास कोणालाही न विचारतां, त्या अधमाधमाची बिलकूल भीति न बाळगतां, व तुझ्यापेक्षां स्वतःच्या जीवाचीही पर्वा न करतां, उजाडलें नाहीं तोंच तुला तेथें घेऊन जाण्यासाठीं आला आहे ! त्या अति नीच **कामसेना**नें तुझी जी कांहीं गांजणूक केली ती त्याच पत्रांत वाचून मला असा कांहीं त्वेष आला आहे कीं सांगतां येत नाहीं ! हे मृदंतःकरणाचे कसले क्षत्रीय राजे असले! ह्यांच्यापेक्षां ते वज्रहृदयीं नीच मांगही हजारपटीनें बरे असें मी समजतों ! चांडाळा ! ( पाहून व चपापून ) पण प्रिये हीं रक्तानें भरलेलीं वस्त्रें दिसतात तीं कोणाचीं ! **गिरजा** कुशल आहेना ?

**कामकंदला**—सख्या **माधवा** ! रागाच्या भरांत आपण मोठ्यानें बोलूं नका ! तो मेला **कामसेन** इथंच कुठं तरी असेल ! आपण मला घेऊन जायला आलां हें आपण चांगलं केलं; पण तुमच्या येण्यानं मला आनंद व्हावा; तुमच्या अति सुखकारक स्पर्शानं माझ्या जन्माचं मला सार्थक झालसं वाटावं; कामानं तप्त झालेल्या माझ्या तनूस कांहींशी शांतता यावी; मनाला उल्हास व्हावा; आपणांस पाहतांच माझ्या दुःखानं व उदासीनतेनं देशांतराला पलायन करावं; **गिरजे**च्या मृत्युनं भाजलेलं काळीज धडधड उडायचं कमी व्हावं; सारांश, म्यां आपल्या दर्शनानं, सुखातिशयानं, व आपल्याशीं पुष्कळ पुष्कळ बोलून धन्य व्हावं ! पण तसें कांहींही न होतां, आपण आपल्या जिवाची आशा सोडून, उताबीळपणाचे आधीन होऊन, आणखी दोन तीन दिवस दम न धरतां, **चंपकमालती**ला न विचारतां व **विक्रमराजा**च्याही दृष्टीस न पडतां आपण असल्या साहसांत पडल्यानं मला अत्यंत दुःख होत आहे ! भयानं काळीज धडधडां उडत आहे ! व भावी सुखाला अंतरविणारी मेली निराशा माझ्या दैवाआड येत आहे ! प्रियकरा ! जिवींच्या जिवलगा ! अजून माझं ऐका ! माझ्यासाठीं आपण आपला प्राण धोक्यांत घालूं नका ! व पुनः ह्या हतभागिनीला दुःखसमुद्रांत ढकलूं नका !

पद.

( अहो स्मशानरक्षका ! बाळासी, या चालीवर. )

माझ्या जिवलग सखया ! परिसावी-
तुम्हीं माझी एवढि विनवणी ! .
नका होऊं प्राणावरती; उदार-
माझ्याकरितां ह्या क्षणीं ! ॥ ध्रु० ॥
मळली सांप्रत माझी विधिरेषा-
नकळे ! काय करिल ममहानी !
मजला कष्टी करवोनी, रडविल-
मजला सखया ! दिनरजनीं ! ॥ १ ॥
तुम्हां पसरूनि पदर; प्रार्थीतें-
अहो ! जाहो ! झडकरि येथूनी !
तुम्हीं नसला मम दैवीं; कंठ मी-
चरचर घेईन तरि चिरुनी ॥ २ ॥

**माधव**—प्रिये ! तूं इतकी घाबरूं नको ! माझ्या जिवाची ह्मणजे मला भीति नाहीं असें नाहीं ! **गिरजे**चा मृत्यु ऐकून मला अत्यंत दुःख होत आहे ! ती पूर्व जन्मीं आपल्या उभयतांचें कांहीं ऋण लागत होती ह्मणून तिनें आपणांवर अगणित उपकार करून ठेवले कीं काय न कळे! पण प्रिये ! त्या नीच द्विपदी **कामसेन** पशूनें तुला फारच छळलें ना ?

**कामकंदला**—आज आपण येण्यापूर्वींच त्यानं माझे जे कांहीं हाल केले ते तर अत्यंत दुःसह होते ! त्यांतून मी वाचून आपण माझ्या असे दृष्टीस पडाल असं मला मुळींच वाटत नव्हतं ! पण मी महत् भाग्याची खरी ! माझी हवी तशी निर्भत्सना करीत " व तुझ्याचमुळें माझें, **चंद्रचुडा**चें व माझ्या या एकंदर राज्याचें वाटोळें झालें ! " असं दांत ओंठ खाऊन ह्मणत, त्या मेल्यानं माझ्या अंगावर एकामागून एक असे तरवारीचे सात आठ वार केले ! व लाताबुक्या खालीं त्यानं मला बेदम केलं ! अंगांतून अजूनही रक्ताचे पाट चालले आहेत ! ही पहा सगळीं पांघरुणं कशीं चिंब भिजून लालभडक झालीं आहेत ! पुढं माझ्या अंगांत वारं शिरल्यानं मी भेरी येऊन पडलें ! आणि डोळे उघडून पहातें तों आपली

मनोहर मूर्ति माझ्या दृष्टीस पडली ! प्रिया ! चारुसुंदरा ! ह्यासाठीं मी ह्मणतें कीं, तो पापी चांडाळ इथंच कुठं दडून बसला असला तर विनाकारण तो आपला प्राण घेईल ! मला मेली आणखी बोलायला शक्ति राहिली नाहीं ! मी जें बोलले व सध्यां बोलत आहें तें आपलं प्रेमच केवळ बोलत आहे ! मी नव्हे !

**माधव**—(साश्रु.) शिव ! शिव ! तुझी ही स्थिति पाहतांच माझें धैर्य गळालें ! व मला शोकाचें अनिवार भरतें येऊन अश्रूंनीं माझे नेत्र अंध केले. अश्रूंनो ! जरा धीर धरा ! व माझ्या प्रियेला मला एकदां डोळेभरून पाहूंद्या !

**कामकंदला**— ( त्याचे डोळे पुशीत ) द्रव्याचा लोभ कांहीं विलक्षण आहे ! त्या मेल्या लोभी **दयाळसिंगाला** देव पाहून घेवो.

**कामसेन**—(त्वेषानें) नीचांनो! सध्यां मीच तुम्हां उभयतांना पाहतों!

**कामकंदला**—**विक्रमाशीं** आपला निभाव लागणार नाहीं ह्मणूनच त्या नीच **कामसेनानं** हे कपटजाल पसरून आपणांस त्यांत फसविलं! प्रिया ! अशा विलक्षण स्थितींत मी आपणांस कसं पत्र पाठवीन ? आपल्या जिवाचा अपहार कां मला प्रीय आहे ? प्राणनाथ ! मी इतकी कठिण हृदया व विश्वासघातकी नाहीं बरं !

**कामसेन**—अधमे तूंच तर माझा सर्वस्वी घात केलास ! तुझ्याचमुळें तुझ्या यारानें मला मांगांहूनही नीच लोकांच्या पंक्तीस बसविलें ! रांडे ! तुझ्या योगानें काय काय झालें आहे तें मी कोठवर वर्णन करूं ?

**माधव**—त्याविषयीं आतां पुनरुक्ति नको ! झालें तें बरें झालें ! आतां त्वरा कर ! बरोबर कांहीं एक घेऊं नको ! अशी सडीच्या सडीच मजबरोबर चल ! आम्ही **धारातीर्थी** उतरलों आहोंत ! तें स्थल येथून अगदीं जवळ आहे! **वरुणावती** नदी तेथें उंच कड्यावरून धबाधब खालीं उड्या घेत आहे !

**कामकंदला**—मी आपल्या मर्जीविरुद्ध कधींही वागणार नाहीं ! पण मला चालायला शक्ति आहे कुठं !

**कामसेन**—( उपहासानें ) यंव ! काय पण दोघे मिटक्या मारमारूं भावी सुखाची साखर खात आहेत !

**माधव**—मी तुझ्या साऱ्या जखमा बांधतों (तसें करूं लागतो)

**कामसेन**—हा आतां मंचकाच्या चोहोंबाजूंनीं हिंडेल ह्मणून मला हळूंच एकीकडे झालें पाहिजे! (तसें करतो) आतां मी कोठून याच्या दृष्टीस पडणार?

**माधव**—हाय! हाय! रे! वज्रहृदया! जाईच्या फुलापेक्षांही जी मृदु, त्या माझ्या प्रियेच्या अंगावर असे भयंकर वार करण्यांत तुला काय मिळालें! निर्दया! तूं केवळ व्याघ्र आहेस! मग तुला या गाईची दया कुठली?

**कामसेन**—रे बैला! ह्या गाईबरोबर तुझ्याही नरडीचा मी आतां घोंट घेतों! घाबरतोस कां? (तरवार उपसतो) हिला घेऊन उंबऱ्याबाहेर पाऊल तर टाक ह्मणजे झालेच तुझे तुकडे तुकडे समज!

**माधव**—प्रिये! तुझ्या मी सर्व जखमा बांधल्या आहेत! आतां माझा हात धरून हळूंच ऊठ! व अशी माझ्या खांद्यावर बैस! देवनगरी सुटतांच आपणांस समरभूमि पार करून जावें लागेल! तेथें आपण पोहोंचलों ह्मणजे तूं आपले डोळे झांकून घे! कारण रणवाद्यांचे व प्रचंड दुंदुभीचे भीषण रव ऐकून तुझ्या कानठाळ्या बसतील! कोमल लतेचीं सुकुमार फुलें तोडण्यास जिचें मन घेत नाहीं; ती तूं वृक्षांवरून स्वच्छंदानें उंच उडणाऱ्या विहंगवृंदाप्रमाणें मोठमोठ्या योध्यांचीं हजारों शिरकमलें शस्त्राघातेंकरून अकस्मात् वर उडून भूलिंगास अर्पण होत असलेलीं, पाहण्यास समर्थ होणार नाहींस! कारंजाप्रमाणें उडणाऱ्या रक्तांच्या चिळकांड्या तुझ्याच्यानें बघवणार नाहींत! मेघपटलांतर्गत स्फुरण पावणाऱ्या चंचल विद्युल्लतेप्रमाणें झळकणाऱ्या असंख्य तरवारी तुझे नेत्र दिपवून टाकतील! रक्ताचे वहात असलेले भयंकर पाट पाहून तुझी मुरकुंडीच वळेल! हत्तींच्या गर्जना, अश्वांचें खेंकाळणें, प्रचंड शंखांचे कोलाहल, ती रणवाद्यांची धडाधड, वीरांचीं शौर्योत्तेजक अत्यंत त्वेषांचीं भाषणें, शस्त्रांचें खणखणणें, कित्येक घायाळ होऊन पडलेल्या वीरांचे कण्हणें कुंथणें, व कित्येकांचे, प्राण जात नाहींत ह्मणून कंठमुक्त रडणें ऐकून तुझी काय बरें स्थिति होईल? अश्वादिकांच्या नालबंद टापा, खालीं खडकास लागून त्यांच्या संघर्षणानें निर्माण होत अस-

लेल्या काजव्याप्रमाणें लक्षावधि ठिणग्या, तुझ्या कमलाकार नेत्रांस असें भासवितील कीं पृथ्वीचें विदारण करून जो मेरुपर्वत वर येऊं पाहत आहे, त्याचेच हे रजःकण होत ! कित्येक ब्रह्मराक्षस, पिशाचें, डाकिणी, हडळी व गृध्रादि पक्षी रक्तमांसाच्या यथेष्ट पानानें तुंद होऊन आनंदानें किंकाळ्या फोडतांना व कर्णकटु शब्द करतांना तुझ्या दृष्टीस पडतांच तूं अत्यंत भयभीत होशील! ज्या अर्थी तूं मला पत्रबित्र कांहीं एक पाठविलें नाहीं ह्मणतेस त्या अर्थी हें कपटजाल त्या अधमानेंच पसरलें असावें; अशी माझी मनदेवता लवते ! असो. त्याच्या कपटजालांत फसून मी आपल्या जिवास अंतरणारा नव्हे ! तूं त्वरा कर ! आतांचे आतांच आपण निघून जाऊं ! **कामसेना**चा तुजवर इतका दाद असतांही अशा दारुण संग्रामसमयीं माझा या महालांत शिरकाव होऊन तुझी भेट झाली; हें तरी आपल्या भावी सौख्याचें एक दर्शकच होय ! शिवाय मारत्यापेक्षां तारता खंबीर असल्यामुळें त्या मूर्खाचें माझ्यापुढें काय चालणार ?

( पडद्यांत गलबला होतो. )

**कामसेन**—हा मूर्खा ! खा आणखी मांडे मनांत ! घे ही नवरी आणि पड बाहेर ! कीं म्यां केलाच तुला ह्या तरवारीचा आहेर ! भोग मग ! खुशाल भावीं सुखें भोग ! व म्हण कीं तारत्यापेक्षांही तुला ठार करणारीं तुझीं हीं अति नीच दुष्कृत्येंच खंबीर आहेत ह्मणून ! पण असल्या अपरात्रीं हीं रणवाद्यें कां बरें वाजावीं ? उभय सैन्यांपैकीं कोणी कोणावर घाला घालून त्याची दाणादाण तर केली नसेल ना ? कां ह्या वेश्यासक्तास कंठस्नान घाला लौकर अशीं हीं वाद्यें मला सूचना करीत आहेत ?

**कामकंदला**—आपण ह्मणतां तें सारं खरं ! पण ही लढाई संपून मेल्या **कामसेना**चा नाश झाल्याखेरिज मला इथून हलावंसं किंवा आपणांला इथं राहून घ्यावंसं वाटत नाहीं ! माझे पाय आंत ओढ घेतात ! जसा कांहीं त्यांना पुढचा प्रसंग मूर्तिमान दिसत आहे !

**कामसेन**—त्यांना कशाला ? इतक्यांत तो तुलाच प्रत्यक्ष दिसेल ! व तोच तुझा अंत करील !

**माधव**—प्रिये! इतका भितरेपणा काय कामाचा? (साश्रु.) अशा अवस्थेंत तुला टाकून मी कसा जाईन? तुला मी प्रिय असेन व माझ्या प्राणाची तुला आशा असेल तर तूं आपला हेका सोड! व लौकर मज-बरोबर चल! हीं पहा रणवाद्यें वाजूं लागलीं! आमच्या सैन्यानें **काम-सेना**च्या सैन्यावर हल्ला केला वाटतें! आतां चहूंकडे धामधूम माजून धराधर व पळापळ सुरू होईल! त्या सपाट्यांत आपण सहज पार पडून इच्छितस्थलीं सुखरूप पोहचूं!

**कामकंदला**—( स्वगत. ) काय बाई करावं? मला मेलं मोठं सं-कट पडलं आहे!

**माधव**—( तिला कुरवाळून. ) गडे! **माधवनयनानंदचंद्रिके**! तला ह्या अभाग्याबरोबर नाहीं ना यायचें?

**कामकंदला**—( स्पर्शसुख अनुभवून, साश्रु. ) अहाहा! किती हा तुमचा स्पर्श गोड आहे बरं? सख्या! आपण इतके निराश होऊं नका! येतें मी आपणाबरोबर! ही दासी आपल्या मर्जीविरुद्ध कधींही वागणार नाहीं.

**कामसेन**—( अत्यंत त्वेषानें ) आजपर्यंत त्या **रतिप्रिये**च्या दुःखानें माझें काळीज तटतटां तुटत असे! पण त्याचे तुकडे न होतां फिरून तें वज्रसारमय होई! परंतु माझ्यासमोर ह्या अधमानें तुला कुरवाळल्यावर त्वां 'अहाहा! किती हा तुमचा स्पर्श गोड आहे बरं?, असा जो उद्गार काढलास!—छे! तो उद्गार कसला? सर्व जगाचा क्षणांत अंत करणारें तें **विष्णूचें** सुदर्शनच होय!—त्यानें मात्र आज माझ्या ह्या काळजाचे तुकडे तुकडे केले! आतां माझ्याच्यानें मुळींच गुप्त राहव-वत नाहीं! ( प्रगट होऊन ) अधमांनो! पापिष्ठांनो, रे नीचांनो! खबरदार येथून हाललांत तर! ह्याच तरवारीनें मृतिकेच्या अणुरेणुसारखे तुमचे अति सूक्ष्म तुकडे तुकडे केल्यावर व त्यामुळें कचाग्राहूनही अत्यंत बारीक अशा तुमच्या आंतड्याच्या चिंध्या चिंध्या झाल्यावर, पाहिजेत तर त्या ह्या मंद वायूनें सुखेनैव हालोत! ( इकडे तिकडे पाहून ) **जयसिंग**! **दयालसिंग**! चला इकडे या! शत्रूंनीं **देवनगरीं**त प्रवेश करून ते ह्या महालाच्या समीप आले आहेत! कारण हीं जीं जवळ

वाजत आहेत तीं रणवाद्यें अनोळखीचीं वाटतात! माझा **चंद्रचूड** असता तर त्यानें शत्रूला कधीं **देवनगरीं**त पाय ठेवूं दिला नसता! ह्या शत्रुरूपी राहूनें माझ्या **चंद्रा**चा खास खग्रास केला आहे; यांत संशय नाहीं! चला लौकर या! (ते येतात) **दयाळा** तूं जा आणि माझा आयुधासह **रथ** सिद्ध करून तो इकडे घेऊन येण्यास **सारथ्यास** सांग जा! (**दयाळसिंग** जातो.) **जयसिंग**! ह्या रांडेच्या कंठावर तरवार ठेवून मी हिच्या छातीवर पाय देऊन उभा राहतों! आणि माझ्यासमक्ष तूं ह्या मूर्तिमंत द्विपदी नृपशत्रूचे हाल हाल करून ह्याला ठार कर.

**कामकंदला**—हाय! हाय! प्रिया! आतां आपलं कोण रक्षण करील? माझं ह्मणणं आपल्या ताबडतोब कसं अनुभवास आलं! (मोह पावते.)

**जयसिंग**—(हात जोडून) राजाधिराज! मैं जातका रजपूत हूं! इसलिये आपके आज्ञानुसार इस नीच बह्मनका चाहे उस तरहसे प्रान ले सकता हूं! लेकीन, खाविंद! आपका नवीन हुया हुवा प्रबल शत्रू जो **विक्रमराज** वो इसी बह्मनका तलाश करनेके वास्ते **चंपकमालती** के कहनेके अनुसार इसी महेलके बिलकूल पास आया है! और बडी दुःखकी बात यह है कीं उस राजाके और नौकरोंके पास आपके मंत्रि जो महाभाग **चंद्रचूड** उनका मुर्दा है! इसलिये मेरा आपके चरनके पास यह अर्ज है कीं पहिले पहेल आप उस **विक्रमकी** खबर लेने वास्ते जाईये! तबतक मैं इन दोनोंका समाचार लेता हूं!

**कामसेन**—छिः! रे मूर्खा! त्या **विक्रमाचा** माझ्या हातून कधीं पराभव होईल असें तुला वाटतें काय?

**माधव**—(धैर्यानें स्वगत.) **विक्रमाच्या** समीपआगमनानें ह्या उभयतांचें माझ्याकडे बरेंच दुर्लक्ष्य होऊन ते एकमेकाकडेसच पाहत उभे आहेत तोंच आपण आपलें पवबारा करावें! पण मग ह्या सुंदरीचें काय होईल व ही मला काय म्हणेल?—छे! तें कांहीं नाहीं! प्रत्येक मनुष्याला सर्वांपेक्षां स्वतःचाच जीव प्यारा असतो! (पळून जातो)

**कामसेन**—**जयसिंग**! तो पहा अधम पळून गेला! चल! धर! धर त्याला! सांपडतांच माझी वाट न पाहतां त्याचे हवे तितके

तुकडे कर ! अथवा असह्य जखमा करून त्यास इकडेच जिवंत धरून आण !

**जयसिंग**—( त्याचे मागोमाग जातो. )

**कामकंदला**—( किंचित् सावध होऊन ) हाय ! हाय ! **माधवा** शेवटीं माझ्या पायीं आपला अंत झाला ना ?

**कामसेन**—अंत झाला पण त्याचा अजून जीव नाहीं गेला ! नष्टे! शत्रु फारच जवळ आला आहे ह्मणून मला तुझे हाल हाल करून प्राण घेतां येत नाहीं ! असो तरवारीच्या एकाच वारानें तुझें काम काढतों ! आतां तरी तूं देवाचें नांव घे ! (-तरवार उगारतो तों ज्याचे हात पाय तुटले आहेत अशा छिन्नभिन्न **माधवास जयसिंग** घेऊन येतो. )

**जयसिंग**—सरकार ! ये लीजिये आपके कहनेके माफिक आपका बल्लन !

**कामसेन**—शाबास ! खरा तूं इमानदार सेवक आहेस ! ( **माधवास** लत्ता प्रहार करून ) रे द्विजकुलांगारा ! तारत्यापेक्षां तुझी असली स्थिति करणारी तुझी अति नीच विषयवासनाच खंबीर आहेना ? ( पडद्यांत अतिशय गलबला होतो. ) **रतिप्रिये**सारखीच ह्या चांडाळणीची आतां अवस्था करतों. ) ( **कामकंदले**च्या उरांत तरवार खुपसतो. )

**जयसिंग**—वो देखो **विक्रमराजा**की सेना ! आप जलदी जाके रथारूढ हुईये !

**दयालसिंग**—( येऊन ) महाराज! सारथी रथ घेऊन हा गलबला ऐकून इकडेच येत होता ! आतां लौकर जाऊन रथारूढ व्हा ! नाहीं तर **चंद्रचूडा**च्या रक्तानें ज्याची तरवार भरली आहे तो **विक्रमराजा** येथेंच येऊन—

**कामसेन**—चला आपण आतां सारेच जाऊं ! ह्या दोघांचीही परीसमाप्ति इतक्यांत होईल !

( सर्व जातात. )

**माधव**—( दुःखानें ) हाय ! हाय ! प्रिये काय ही आपली स्थिति ?

जिवाच्या भीतीनें म्यां तुझ्याशीं कपट केलें पण त्याचें मला तेच वेळीं प्रायश्चित मिळालें ! तुझा माझा मृत्यु आज येथेंच होता म्हणून तुझें ऐकण्याची मला बुद्धि सूचली नाहीं ! व **कामसेन** जवळ असतांही आपणांस दिसला नाहीं ! मृत्यूनें तेच वेळीं आपणांस अंध केलें ! देवारे ! देवा ! माझ्या पश्चात् त्या बापड्या **शृंगारवल्लरी**ची व **चंपकमालती**-ची काय अवस्था होईल ? त्या काय करतील ? कोठें जातील ? कोणाचे पाय धरतील ? व वैधव्यावस्थेंत किती काळ लोटतील ? माझ्या स्वरूपास व मधुर कंठास भाळून एक महत्संकटानें राक्षसाच्या हांतून सुटून परदेशांत येऊन दीन झाली ! दुसरी थोर कुळांतली असून मला व आपल्या आईबापाला व एकंदर जगालाही अंतरली ! आणि प्रिये **कामकंदले** ! तुझी अवस्था तर मला दिसतच आहे ! किती हा रक्ताचा पाट तुझ्या उरांतून वहात आहे तरी ! तूं आपले डोळे मिटूं नकोस ! ते उघड! माझ्याशीं दोन शब्द बोल! आणि मग प्राण सोड ! ये ! प्रिये ! आलीकडे ये ! व मला—ह्या थोब्याला, ह्या पांगळ्याला, ह्या अधमाधम विषयासक्ताला; माझ्यावर प्रेम करणाऱ्या प्रिय जनांस दुःखडोहांत ढकलणाऱ्या या निर्दयाला, या विचारहीनाला व या सार्थ नृपशूला—एकदां घट्ट आलिंगन दे ! म्हणजे मी सुखानें प्राण सोडीन! मी सर्वस्वी तुझा अपराधी आहें! सुखांतून काढून तुला दुःखांत ढकललें ! व तुझे प्राणही म्यांच घेतले ! अंतका **यमा** ! माझे प्राण लौकर ने ! व **चित्रगुप्त** सांगेल तशा तप्तलोहार्गलालिंगनादि मला यातना दे ! त्या मी आनंदानें भोगीन ! पण माझ्या कलेवरांत प्राण आहे तोंपर्यंत मला त्या माहात्म्या **विक्रमा**चें मात्र दर्शन होऊं देऊं नकोस! त्याचें मला दर्शन झाल्यावर माझी काय बरें अवस्था होईल! माझीं मातापितरें खरींच धन्य! कीं ज्यामुळें तीं ही माझी अत्यंतदीनावस्था पाहण्यास वांचलीं नाहींत !

**कामकंदला**—सख्या **माधवा** ! मला बोलवत नाहीं; पण आपण आतां किती शोक कराल ? त्याचा कांहीं उपयोग कां आहे?—आई ग! काय मला वेदना होतात ह्या ! माझ्या अंगांत शक्ति नाहीं तरी मी मोठ्या कष्टानें फरकटत येऊन आपणांस एकदां आलिंगन देतें आणि मग प्राण सोडतें ! विनाकारण आपण दीन होऊन शोक करूं नका !

**माधव**—ये ! प्रिये ! ये! व एकदां दे मला शेवटलें आलिंगन ! मी नाहीं करणार शोक !

**कामकंदला**—(त्यास आलिंगून)

पद.

(चाल—मी तप्त जरी मदन शरें०)

**परिरंभ आज होय सख्या ! हेंच अंतिचें !**
**त[illegible]न्यसौख्य असे हेंच अंतिचें !**
**अनुरागयुक्त भाषण हो ! हेंच अंतिचें !**
**त्वद्दर्शनही होय सख्या ! हेंच अंतिचें ! ! ! १**

(पडद्यांत—हाय! हाय! आज देवनगरीचें वैभव बुडालें! बिचाऱ्या **कामसेनाचा विक्रमानें** वध केला! )

**माधव**—आज मी धन्य आहें! प्रियेचें आलिंगनसुख अनुभवीत, आहें तोंच माझ्या कानीं **कामसेनाचा** मृत्यु यावा ही किती बरें आनंदाची गोष्ट आहे! प्रिये! मी तुझें ऐकलें असतें तर आपण दोघें कोणत्या स्थितींत असतों ?

**कामकंदला**—(खोल आवाजानें) आतां त्या गोष्टी कशाला? मी असतांनाच **कामसेन** मेला हें फार फार चांगलं झालं! अयाई!

**माधव**—शिव ! शिव ! प्रिये ! तुझ्या तोंडीं बुरबुडा आला ! चाललीस ना मला टाकून ! हे विश्वभक्षक काळा ! तूं तरी माझा अंत कां पाहतोस ?

**कामकंदला**—(अडखळत) म-म-मा-ध-वा! जा-जा (मरून पडते.)

**माधव**—हाय ! हाय ! काय हें ? प्रिये ! तूं बोलतां बोलतां मला सोडून गेलीस ना ? माझी तुला कांहींच कां दया येत नाहीं ! फार नाहीं ! आणखी अर्धी घटका माझी वाट पहा ! शाबास काळा ! शाबास ! तूं हातांत पाश घेऊन आलास; बरें झालें ! तुझें स्वरूप जरी अत्यंत भयंकर आहे तरी तुझ्याशीं भाषण करण्यास मला धैर्य येतें ! त्वां मला नेलेंस म्हणजे यमाकडून माझे हवे तितके हाल करीव ! पण माझ्या प्रियेस—ह्या **कामकंदलेस**—हात सुद्धां लावण्यास सांगूं नको ! का-

रण तिनें माझ्यावर शेवटपर्यंत निर्मळ प्रेम ठेवलें तरी म्यां तिच्याशीं कपट केलेंच ! ( किंकाळी फोडतो ) आ !–आ ! त्यां कोठें असतील आतां ? अर्रर ! काळानें माझें नरडें धरलेंच ! आ–!

( प्राण जातो. )

---

## प्रवेश ३ रा.

स्थल—वरुणावर्तांचा धबधबा.

( चंपकमालती रडत रडत येते. )

**चंपकमालती**—थांब ग बाई ! शृंगारवल्लरी ! जरा थांब ! प्राणनाथांच्या शोधासाठीं इतक्या तातडीनं तुलाच एकटीला स्वर्गास जाणं येत नाहीं ! माझ्यावर तुझी फारच ममता असे ! मग मला टाकून तुला माझ्या आधींच देवाच्या घरीं जाणं कसं बरं वाटतं ? धन्य बाई तूं ! प्राणनाथांचा मृत्यु ऐकतांच त्वां धाडदिशीं अंग टाकलं तें टाकलंच ! पुनः ह्मणून त्वां डोळे उघडले नाहींत ! त्वां माझ्याकडं पाहिलं नाहीं ! फार तर काय ! पण धरणीवर अंग टाकतेवेळीं तुझी दांतखीळ बसून जिभेचा तुकडा पडला तरी त्याचं तुला भान नाहीं ! धन्य तूं ! व धन्य तो देव कीं ज्यानं तुझं गाऱ्हाणं तेव्हांच ऐकलं ! पण हीं हतभाग्या, ही विफलजीविता. ही कठोरहृदया, ही पापिष्टा, अजून कशी जिवंत आहे ? प्राणनाथ ! काय हो हें आपण केलंत ? आपल्या ह्या कृतीनं मी सर्वस्वी बुडालें ! माझा घात झाला ! माझ्या तोंडास कालिमा आली ! मी जगांतून उठलें ! ज्यांच्या पायांपाशीं येऊन हात जोडून मी कृतापराधांची क्षमा मागणार होतें, तीं माझीं मातापितरें मला अंतरलीं ! हा ताता ! हे ! आई ! तुमची मी अत्यंत लाडकी होतें ! तुम्ही माझे हरएक लळे पुरविलेंत ! व सरशेवटीं आज मला आपण सर्वस्वी दीन करून टाकून गेलांत ना ? हाय ! हाय ! आतां मी आपल्या निरूपयोगीं प्राणांचं काय करूं ? प्राणांनो ! लौकर मला सोडून पुढं चाला तेव्हा ! व शृंगारवल्लरीला, नाथ माधवाला, माता कुमुद्वतीला व तात

**चंद्रचुडा**ला मधींच थांबवा ! ही पहा मी तुमच्या मागोमाग आलेंच ! देवा ! **गुरूजनांची** मर्यादा उल्लंघन करून मी आपला हेका शेवटास नेला ह्मणून तर त्वां त्याबद्दल मला हें शासन केलं नाहींस ना ? **काम-कंदले** ! तूं मोठी धन्य व तूं मोठी भाग्याची, कीं ज्यामुळं प्राणनाथ तुझ्याजवळ असतांच तुझा अंत झाला ! पण ही अधन्या व अभाग्या ह्या **वरुणावती**वर इतका आक्रोश करीत असतांही तिचा अंत होत नाहीं ! माझा हा आक्रोश ऐकून तीही रडायला लागली ! सखे **वरुणा-वती** ! माझी ही दीनावस्था पाहून माझ्याबरोबर वृक्षपाषाणही रडायाला लागले ! पण आतां त्याचा काय उपयोग ! प्राणनाथांचं छिन्नभिन्न झा-लेलं प्रेत पाहण्यास घटकाभर राहीन ह्मटलं तर वैधव्यावस्थेंत मला त्या **विक्रमाच्या** दृष्टीस पडावं लागणार आहे ! व मी एकदां त्याच्या दृष्टीस पडलें ह्मणजे असा सोन्यासारखा संधि मला पुन्हां मिळणार नाहीं ! त्या प्राणनाथांच्या प्रेतास माझा इथूनच नमस्कार असो! (जरा चालत जाते) आतां मला ठेंचा लागत नाहींत ! माझ्या पायांतून रक्त निघत नाहीं ! मला मूर्च्छा येत नाहीं ! अशा भयंकर रात्रीं **भुतं** येऊन मला भिववीत नाहींत ! **वाघ** येऊन मला खात नाहींत! **काळसर्प** येऊन मला डसत नाहीं ! हाय ! हाय ! निरुपयोगी वस्तूंचं कांहींही होत नाहीं व तिला कोणीही पुसत नाहीं! वर पाहून **चंद्रा**! म्यां **चंपकमालती**ला वैधव्यावस्थेंत पाहिलं असं तूं जर कोणाला सांगशील तर तुझी काया काळीटिक्कर पडेल! तूं आतां मजबरोबर कां येतोस ? मला जाऊं दे व हा देह मला माझ्या **वरुणावती**स अर्पण करूं दे ! ( धबधब्याजवळ जाऊन ) मेल्या मना ! भिऊन आतां कांहीं फळ कां आहे ? ह्या धबधब्याचा प्रचंड ध्वनी ऐकून तूं भयानं कांपू नकोस ! हा धबधबा नव्हे माझी अवस्था पाहून ह्या **वरुणावती**ला शोकाचे जे कढ येत आहेत; व त्यांचा नाद आहे ! मी आंत उडी टाकल्यावर हा शांत होईल ! तर कर एकदां दृढनिश्चय ! आणि दे हें पापी कलेवर आंत फेंकून ! प्राणनाथ थांबाहो थांबा ! आलेंच मी !

(जाते.)

## प्रवेश ४.

### स्थळ—धारातीर्थ.

विक्रम—( येऊन. ) सरशेवटीं त्या कामसेनानें बिचाऱ्या कामकंदलेचा व माधवाचा कपटानें प्राण घेतलाच ! त्यानें हें कपट करून त्या गरीब ब्राह्मणाचा प्राण घेतला नसता तर कामसेन आज खरोखर जिवंत असता ! त्यानें दयाळसिंगास माझ्या दृष्टीं न पडण्यास सांगून मुकाट्यानें माधवास कामकंदलेच्या घरीं घेऊन येण्यास सांगितलें ! व माधवास कामकंदलेचें बोलावणें खरें वाटण्याकरितां त्यानें स्वतःचतिच्या नांवानें एक पत्र लिहून त्याजवळ दिलें ! आणि शेवटीं त्यानें त्याची ही स्थिति केली ! जातेसमयीं तोच माधव जर मला विचारून जाता तर कामसेनाचे हजारों लोक विनाकारण बळी पडले नसते ! कामसेनाचा नाश झाला नसता ! व माझ्या सर्व श्रमांवर पाणी पडलें नसतें. इकडे शृंगारवल्लरीनें आपला देह ठेवला नसता व बिचाऱ्या चंपकमालतीचें अनाथ प्रेत रणावळीच्या धबधब्यांत सांपडलें नसतें ! कामकंदला ही वेश्या, जरी कुलीन स्त्रीच्या योग्यतेची होती तरी माझ्या सांगण्याप्रमाणें जर माधवानें तिचें नांव अजीबात सोडलें असतें तर आज असा दुर्धर प्रसंग न येता ! ही वेश्या मोठी सज्जन होती तरी तिच्या नादीं लागण्यानें माधवाचा असा भयंकर परिणाम झाला ! कामसेन आपल्या राज्यास व जीवास मुकला ! चंद्रचूडाचेंही तसेंच झालें ! परोपकारासाठीं झालेल्या हानीचा उच्चार करूं नये; असें म्हणतात ! पण इतके अचाट श्रम करून ज्यां सहस्रावधी लोकांचे रणदेवतेला बळी दिले, त्यांच्या स्त्रियांस वैधव्य दिलें व त्यांचीं मुलेंबाळें अनाथ केलीं ! केवढी ही तिसऱ्या ठिकाणीं माझी हानी ! अपात्रीं दान केल्यानें पाप लागतें ! तसें ह्या वेश्येसाठीं अधीर झालेल्या माधवास साह्य केल्यानें मला पाप व अपयश दोन्हींही लागलीं ! तिकडे तो जयसींग गडप झाला व दयाळसींगही पळून गेला ! सज्जन वेश्येच्याही भरीं पडल्यानें इतका भयंकर परिणाम होतो तर ज्या स्त्रिया खरोखर “ वेश्या ” च असतात; त्यांच्या नादीं लागण्यानें याहूनही किती भयंकर परिणाम होतील ! पण मनुष्य एकदां कामानें अंध झाला म्हणजे त्या-

ला कांहीं दिसत नाहीं ! त्याला कांहीं ऐकूं येत नाहीं ! त्याला कांहीं वाटत नाहीं ! त्याला कीर्तीची चाड राहत नाहीं ! त्याला स्वजनाची दया येत नाहीं ! तो निर्दयापेक्षां निर्दय बनून व मृत्यूचीही भीति न बाळगून इहपरलोकांस आंचवतो ! कांहीं लोक तर इतके दुष्ट व नीच असतात कीं त्यांना एकदां वेश्येचा नाद लागला कीं, त्यांस स्वस्त्री नकोशी होते. ती त्यांच्या डोळ्यांत सलूं लागते, तिचीं बोधामृतरूपीं मंजुभाषणें विषासारखीं कडू लागतात ! व त्यामुळें ते अधमाधम त्या क[illegible] उलटा अंमल बजावितात ! ह्मणजे स्वस्त्रीला नाना प्रकारचीं दुःखें देऊन कधीं कधीं तिला स्वर्गासही पाठवितात ! हाय ! हाय ! केवढें हें पाप ! द्विजाग्निसाक्षीनें वचन दिलेल्या स्वस्त्रीस बुद्धिपुरस्सर विरहानलांत भाजून मारणें व वेश्येच्या भरीं पडून तिच्या संतोषासाठीं अनीतिकारक अति नीच कृत्यें करून लोकांत सर्वस्वी अपकीर्ति करून घेणें, आणि धनाचा असल्या अयोग्य ठिकाणीं हवा तसा व्यय करून स्वतःचें आयुष्य कमी करून घेणें ! अथवा त्यापासून प्राप्त झालेले अति भयंकर रोग दीन वदनानें अत्यंत दुःसह वेदनासह सोशीत, कृतकर्मांचा पश्चात्ताप करीत रडत बसणें व ही त्याची विलक्षण अवस्था इतरांना दिसत असूनही जेव्हां ते विषयलोलुप त्याचेंच अनुकरण करतात आणि करवितात तेव्हां ह्या पापास काय ह्मणावें ! माधवाच्या संबंधानें पाहतां तो जसा [illegible]मकंदलेवर आसक्त होता तसा स्वस्त्रियांवरही होता ! त्यानें त्यांस कोणत्याही प्रकारचें दुःख दिलें नाहीं ! ही एक समाधान मानण्यासारखी गोष्ट आहे! पण ह्या समाधानाचा आतां काय उपयोग! बाप हो ! मित्रहो ! बांधव हो ! अहो सदसद्विचारी गृहस्थ हो! तुह्मांपैकीं जर कांहीं लोक असल्या मार्गाचें अवलंबन करूं लागले तर त्यांस तुम्ही कृपा करून असें सांगा कीं:—

**श्लोक.**

**वेश्येचा नाद सोडा, स्वगृहिणीवर हो प्रेम अत्यंत ठेवा !**
**संसारीं सौख्य सेवा, परि निशिदिनिं तो ईश चित्तीं भजा[illegible]**
**प्रत्येकाचें स्वदे[illegible]ति लव करणें हाय कर्तव्य हेंच !**
**तेणें तीं पारतंत्र्यादिक बहु असुखें नष्ट होतात साच[illegible]**

( पडदा पडतो. )

# कामकंदला नाटकाचें शुद्धीपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | ९।१० | ' सर्व रसिक रंजनैक परायणा 'चा | ' रसिकरंजनैकपरा-यणा 'चा |
| ३ | १२ | असों, | असो, |
| ९ | ४ | गमती | गमति |
| ९ | २७ | कभी | अभी |
| २२ | २८ | येऊनि | येउनि |
| ३० | १४ | राजारंजक | राजारंक |
| ३० | १६ | त्द्वखड्गें | त्वत्खड्गें |
| ३० | २१ | सांभा | सांब |
| ३९ | ६ | सद्गीदत | सद्गदीत |
| ३९ | ११ | युक्ति पर युक्तीनं | युक्ती प्रयुक्तीनं |
| ४३ | ३ | राहटी | रहाटी |
| ४६ | २२ | तरी | तर |
| ४८ | २३ | महादापराधी | महा अपराधी |
| ५१ | २८ | अस्मानचा | अस्मानाचा |
| ५८ | २१ | तींनं | तिनं |
| ७१ | ३० | तरूंने ! | तरूंनो ! |
| ७१ | ३० | वी | व |
| ७९ | १ | झाले अरक्त | झाले नेत्र आ |
| ८९ | १७ | विक्रम राज्याच्या | विक्रम रा |
| ९० | २१ | असुनि | अ |
| ९२ | २५ | कापले असते गेले | कापले |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १०० | ४।८ | स्वभाविकपणें | स्वाभाविकपणें |
| १०४ | २१ | सारखी | सारवी |
| १०४ | २२ | स्वमांत | स्वप्रांत |
| १०८ | १ | उच्छंगी | उत्संगी |
| ११३ | ९ | करतोस | करतेस |
| ११४ | २८ | येईल ! | जाईल ! |
| १२२ | २५ | सद्रन्त | सद्रत्न |
| १४२ | ८ | नृपशत्रूचे | नृपशूचे |
| १४३ | २५।२६ | परी समाप्ति | परि समाप्ति |
| १४६ | २७ | चाल तेव्हा | चालते व्हा |

**सूचनाः**—ह्या शिवाय छापण्याचे लहानसान आणखी प्रमाद आहेत; पण ते सहज उमजण्याजोगें असल्यामुळें येथें दिले नाहींत.

---

अपयश
सांगही
भयंकर परि
च असतात;
होतील ! पण म